# जळतें रहस्य

[ स्टीफेन झ्वायग याच्या 'दी बर्निंग सीक्रेट'
या इंग्रजी कादंबरीचा मराठी अनुवाद ]

अनुवादक :

बा. भ. बोरकर



किंमत २ रुपये ] [ प्रथमावृत्ति १९४५

बलवन्त पुस्तक भाण्डार.
गिरगांव नाका, मुंबई नं. ४

# बोरकर–वाङ्मय

( प्रकाशित )

| | |
|---|---|
| प्रतिभा | ( काव्य ) |
| जीवनसंगीत | ( ,, ) |
| कागदी होड्या | ( लघुनिबंध ) |
| मावळता चंद्र | ( कादंबरी ) |
| अंधारांतली वाट | ( ,, ) |
| जळतें रहस्य | ( कथा-भाषांतरित ) |



( आगामी )

| | |
|---|---|
| दूधसागर | ( काव्य ) |
| खेळणीं | ( लघुनिबंध ) |
| संपातीचे पंख | ( कादंबरी ) |
| तपोवनांत | ( भाषणें ) |
| गांठीभेटी | ( स्वभावचित्रें ) |



# तोंडओळख—

स्टीफन् झ्वायगचें कोणतेंहि नवें पुस्तक दिसलें कीं केव्हां एकदां तें वाचून टाकतों असें मला होऊन जातें. Um Segrêdo Ardente ही त्याची ललितकृति माझ्या हातीं आली त्यावेळीं याच उत्सुकतेनें मी वाचायला घेतली आणि हां हां म्हणतां वाचून पुरी केली. सामान्यपणें कोणतेंहि चांगलें पुस्तक मजकडून लवकर वाचून होत नाहीं. असें असतां अवघ्या तासादीडतासांत हें वाचन झालेलें पाहून माझा मलाच अचंबा वाटला. असा विलक्षण चटका लावणाऱ्या या कथेचा आस्वाद माझ्या पत्नीलाहि मिळावा या हेतूनें फुरसतीच्या वेळीं मी रोज तिचा अनुवाद तिला ऐकवूं लागलों. थोड्याच वेळांत या कथेनें तिच्या मनाची जी पकड घेतली ती पाहून माझा उत्साह दुणावला आणि वाचून अनुवाद करतांना रसप्रवाहाला पडणारा खंड दूर करण्यासाठीं मी थोड्याच दिवसांत हा अनुवाद लिहून हातावेगळा केला. पुढें कांहीं दिवसांनीं Burning Secret हा याच कथेचा इंग्रजी अनुवाद मला वाचायला मिळाला. तो कित्येक ठिकाणीं पोर्तुगीज अनुवादाहून सरस असल्याचे आढळून आल्यामुळे मी तदनुसार माझ्या अनुवादात योग्य ते फेरफार केले. प्रस्तुत कृतीची जन्मकथा ही अशी आहे.

या एवढ्या निवेदनावरून केवळ योगायोगानें मी अनुवादलेखनाकडे वळलों हे दिसून येईल. मात्र या अनुभवाने कांहीं गोष्टी मी शिकलों त्यांतली एक ही कीं अनुवादलेखन हे सकृद्दर्शनी वाटतें तितके सोपे काम नाहीं. कला या संज्ञेला तें पात्र आहे कीं नाहीं याबद्दल दुमत असले तरी त्याला कौशल्य विपुल लागतें. त्यांत मूळ कथा पाश्चात्य भाषेंतली आणि पाश्चात्य जीवनाची मीमांसा करणारी असली म्हणजे ती स्वाभाविक आणि सुबोध मराठी वळणांत बसवायला कितीहि दक्षता घेतली किंवा केवढेहि चातुर्य खर्च केले तरी तें अपुरेंच वाटतें. दुसरी गोष्ट ही कीं याहि लेखनांत एक प्रकारचा आनंद आहे.

त्यांत नवनिर्मितीपासूनचा किती आणि मूळ लेखकाशीं तादात्म्य पावण्यापासूनचा किती हें सांगणें दुर्घट असलें तरी स्वतंत्र प्रतिभेला सुद्धां मोह घालण्याचें आणि तिचें परिपोषण करण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. तेव्हां आपल्याकडील लेखकांनीं फावला वेळ अनुवादलेखनांत वेचल्यास त्यांची ही मानसक्रीडा त्यांच्या प्रतिभेला आणि पर्यायानें मराठी साहित्याला उपकारक झाल्याशिवाय रहाणार नाहीं एवढा निर्वाळा या लहानशा अनुभवानें मी देऊं शकतों. त्यामुळें जगांतलें उत्कृष्ट साहित्य मराठींत वैपुल्याने अवतीर्ण होईल आणि सौंदर्याच्या निर्मितीपेक्षां तद्विषयक शुष्क चर्चेकडे आणि जीवनाची हृद्य चित्रणे काढण्याऐवजीं मस्तकशूळ उठविणाऱ्या तत्संबाधिक वादांकडे वळण्याची जी घातक प्रवृत्ति आपल्या वाङ्मयांत मूळ धरूं पहात आहे तिचे वेळींच उच्चाटण होण्यास मदत होईल. कारण सौंदर्याच्या विविध अवतारांची प्रत्यक्ष प्रतीती आणि जीवनाचा सर्वांगीण साक्षात्कार हीं सतत मिळत राहिल्यामुळेंच सामान्य वाचकाची रसिकता अधिकाधिक सशुद्ध आणि संस्कारी होत जात असते.

वस्तुत: या सर्वमान्य सत्यांचा उच्चार करण्याची आज तरी गरज भासूं नये पण झ्वायगसारख्या महान प्रतिभेच्या जगन्मान्य साहित्यस्रष्ट्याचीं आतांपर्यंत तीनाहून अधिक पुस्तकें मराठींत अनुवादित झालेलीं नाहींत हें पाहिल्यावर तीं बोलून दाखविल्याशिवाय रहावत नाही. इंग्रजींत झ्वायगची किती पुस्तके अनुवादित झालेलीं आहेत हे मी सांगूं शकत नाहीं पण पोर्तुगेजींतून तीसांहून अधिक पुस्तकें मला पहावयास मिळालीं आहेत. त्यांत कथा, कादंबरी, निबंध, प्रबंध, चरित्र, स्वभावचित्र इत्यादि सारे वाङ्मयप्रकार आढळतात आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं त्याने ते सर्व सारख्याच असाधारण प्रभुत्वानें हाताळले आहेत. वाङ्मयवृक्षाची अशी क्वचितच एखादी शाखा असेल कीं जिला झ्वायगचा पुण्यप्रद हस्तस्पर्श घडला नाहीं आणि जिला जिला म्हणून हें भाग्य लाभले ती ती सुवर्णाच्या फळाफुलांनीं बहरून आल्याशिवाय राहिली नाहीं. अशा थोर साहित्यकाराचे चरित्र आणि वाङ्मय प्रगमनशील राहूं इच्छिणाऱ्या मराठीच्या संग्रहीं शक्य तितक्या लवकर मिळूं शकलें पाहिजे.

प्रस्तुत कथेची चौकट, तिच्यांतील पात्रे, त्यांचे स्वभावविशेष, त्यांचा कलह, जिच्याशीं तो गुंतला आहे ती समस्या, त्या समस्येतून निर्माण होणारे विविध प्रश्न, लेखकाचे कथनकौशल्य, कथाविस्तार करतांना त्यात कुठेहि स्वतः प्रगट न होण्याची चतुराई या व इतर अनेक कथाविशेषांवर पुष्कळ सांगतां येण्यासारखे आहे. पण झ्वायगसारख्या महान प्रतिभावंतांची साहित्य-सृष्टि ही विधात्याच्या सृष्टीप्रमाणे एकाचवेळीं ज्ञान, रंजन, उद्बोधन आणि संजीवन यांची खाण असते; भाष्याच्या मर्यादेत ती बसू शकत नाहीं आणि रसपिपासू अंतःकरणांत स्थान मिळवायला तिला तिची मध्यस्थीहि पण लागत नाहीं. म्हणूनच त्याच्या वाङ्मयाबद्दल बोलण्याचा मनस्वी मोह होत अस-तांनाहि हातून रसप्रमाद घडू नये म्हणून मी तो आवरून धरीत आहे. हीच कथा सामान्य लेखकाने कशी हाताळली असती, तिच्यांतील केंद्रबिंदुत्व एडग-रला मिळाले असते कीं अन्य कुणाला मिळाले असते आणि ते तसे मिळते तर कथेच्या परिणामांत आणि सार्थकतेत काय अंतर पडले असते हें ठरविण्याइतका मराठी वाचक सुबुद्ध आहे असे मी मानतों.

शेवटीं या कृतीच्या वाचनाने झ्वायगबद्दलचे महाराष्ट्राचे प्रेम वृद्धिंगत व्हावे आणि त्यामुळे त्याचे समग्र वाङ्मय मराठींत उपलब्ध होण्याची सोय व्हावी म्हणून मी ही अल्पकृति मराठी वाचकांना सादर करीत आहे. तिच्या प्रकाशनाची जबाबदारी घेतल्याबद्दल माझे मित्र श्री. मोघे आणि तिच्या मुखपृष्ठाची तत्परतेने सजावट करून दिल्याबद्दल माझे चित्रकार मित्र श्री. दलाल यांचा मी ऋणी आहें.

केपें, गोवा १-७-४५ **बा. भ. बोरकर**

# दोन चरित्रें

## डॉ. बाळकृष्ण—चरित्र, कार्य व आठवणी

संपादक : **मो. रा. वाळंबे**, बी. ए., बी. टी.

राजाराम कॉलेजचे आदर्श प्राचार्य कै. डॉ. बाळकृष्ण यांच्या आंतरराष्ट्रीय कीर्तीचें रहस्य जाणण्याची तरुण विद्यार्थ्यांची इच्छा सर्वथैव पुरी करणारा अमोल ग्रंथ. **साहित्यसम्राट श्री. तात्यासाहेब केळकर** यांची सुंदर प्रस्तावना. पृष्ठे ३००, किं. ३॥ रु., ट. ख. ६ आणे.

## खांडेकर—चरित्र आणि वाङ्मय

लेखक : **प्रो. मा. का. देशपांडे**, एम्. ए.

पंचविसाव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष सुप्रसिद्ध साहित्य-सेवक **श्री. वि. स. खांडेकर** यांचें चरित्र या पुस्तकांत प्रारंभी देण्यांत आलें असून पुढें गुजगोष्टी-लेखक, टीकाकार, लघुकथा-लेखक, कादंबरीकार व चित्रपट-कथालेखक या दृष्टीने एकेक स्वतंत्र प्रकरणांत खांडेकरांच्या वाङ्मयाचें परीक्षण करण्यांत आलें आहे. शेवटीं खांडेकरांचा विनोद आणि भाषाशैली याबद्दल विवेचन केले असून प्रो. फडके व खांडेकर यांच्या वाङ्मयाची तुलना केली आहे. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासूंना अत्यंत उपयुक्त व संग्राह्य.

पृष्ठें ३००, किं. २॥ रु., ट. ख. ६ आणे

**स्कूल अँण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर**

एक्स्प्रेस सिमरिंग स्टेशनात आली तशी इंजिननें एक कर्कश शिटी घातली. एक क्षण शांततेचा गेला आणि त्या स्फटिकवत् डोंगरी हवेंत डब्यांनीं थोडा आराम केला. गाडींतून एक दोन प्रवासी खालीं उतरले आणि काहीं नवे लोक आत चढले. मागून पुढून चढ्या आवाजांतले उद्गार वातावरणात फेंकले जाऊं लागले. पुन्हा एकदां इंजिननें कर्कश शिटी घातली आणि फुरशासारखी दिसणारी ती डब्याची काळीसावळी माळ ओढीत नेत ती बोगद्याच्या जबड्यात अदृश्य झाली. साऱ्या वनश्रीवर पुन्हां एकदां शामक शांति पसरून राहिली आणि वाऱ्याचे झोत खेळून गेल्यामुळें हवेला विलक्षण सुखकरता प्राप्त झाली.

उतरलेल्या मंडळींमध्यें एक तरुण मनुष्य आपल्या हंसऱ्या मुद्रेमुळें आणि नीटनेटक्या पोषाखामुळे चटकन नजरेंत भरत होता. त्याची चाल मोहक पण चपळ असल्यामुळे तो सर्वांआधीं गाड्याच्या स्टॅंडशीं येऊन पोंचला. त्याने एक गाडी केली आणि विशेष घाई न करतां आपण पसंत केलेल्या हॉटेलकडे त्यानें ती गाडीवानाला हांकायला सांगितलें. वसंत ऋतूंचा भर होता आणि मे जूनात दिसणारे शुभ्र अस्थिर ढग आकाशांतून धावत होते. कधीं ते शिवाशिवीचा खेळ खेळत होते तर कधीं लपंडाव खेळत होते; कधीं एकमेकांना आलिंगने देत होते तर कधीं पळून जात होते; कधीं पुष्पसदृश हातानीं निरोप देत होते तर कधीं देवदूतांप्रमाणे अंतर्धान पावत होते; कधीं अकस्मात प्रगट होत होते तर कधीं खोडकरपणानें हळूच शेजारच्या पर्वतांना माकडटोप्या घालीत होते. इतक्यांत भिजून

चिंब झालेल्या कृशकोमल वृक्षवेलींतून चंचल आणि मस्त वारा जोरानें वाहूं लागला आणि त्यासरशीं त्याचीं गात्रें कडकड वाजूं लागून तेजस्वी ठिणग्याप्रमाणें लक्षावधि जलकण जमीनीवर शिंपडूं लागले. हिमाच्छादित पर्वतशिखरावरून वाऱ्याचे अतिशीतल प्रवाह खालीं वाहत येत होते आणि त्यांच्या तिखटपणामुळें श्वास घेणेंसुद्धां कठीण जात होतें. चराचरात एकच अस्थिरता भरून राहिली होती. उतरणीवरून घोडे त्याच्या रुपेरी गळपट्ट्यांच्या मंजुळ तालावर लीलेने दुडदुडत होते.

हॉटेलात पोंचल्यावर पहिल्या प्रथम त्यानें पाहुण्यांची यादी पाहिली आणि एकहि ओळखीचे नांव न निघाल्यामुळें त्याची निराशा झाली.

"इकडे येण्याची ही कुठली अवदसा आठवली मला!" तो पुटपुटला, "वाटेल ती भिकार कचेरीसुद्धां या एकलकोंड्या जागेपेक्षां शतपटीनं बरी! एक मी फार आधीं तरी येऊन पोंचलों आहे—नाहीं-तर उशिरां तरी. आपल्या मुख्याचे नशीब काहीं ठीक दिसत नाहीं. या इतक्या लोकांत आपल्या ओळखीचें एक माणूस असेल तर शपथ! या यादीला शोभा देण्यापुरत्या एक दोन स्त्रिया तरी! तसं असतं तर निदान त्यांच्या जिवावर अनुरंजनाचा एक लहानसा खेळ खेळून तरी हातीं आलेल्या या आठवड्याचें चीज करतां आलें असतें."

हा तरुण ऑस्ट्रियन खानदानींत मोडत होता आणि वरिष्ठ नोकर-शाहींत काम करीत होता. त्याने आठवड्याची रजा घेतली होती. मात्र त्याला खरोखरच विश्रांतीची गरज होती म्हणून नव्हे. त्याचें म्हणणें असें होते कीं आपले सहकारी जर मजेला निघाले आहेत तर आपणहि त्यांचा मार्ग कां चोखाळूं नये! तत्वचिंतनाचें बॅरन ओटोला जरी वावडें

नव्हते तरी त्याचा स्वभाव मुख्यतः सहवासप्रिय होता आणि जावें तिथें त्याचें हार्दिक स्वागत होई. एकान्ताचा त्याला थोड्याच वेळांत कंटाळा येत असे आणि स्वतःचा सहवास त्याला नकोसा होऊन जाई. एकट्यानें रहावें लागलें म्हणजे आपली जास्त जास्त ओळख करून घ्यावी लागते म्हणून एकान्त तो बुद्धिपुरस्सर टाळीत असे. स्त्री पुरुषांच्या खांद्याला खांदा भिडल्याशिवाय आपल्या बुद्धीला धार येत नाहीं, भावनांची ज्वाला उफाळून उठत नाहीं, उल्हास आनंद व्यक्त होत नाहीं हें त्याला अनुभवानें माहात झालें होते. एकटा असला म्हणजे त्याला स्वतःचें जीवन आगपेटींतल्या काडीप्रमाणे निश्चल आणि अचेतन वाटूं लागे.

हॉटेलच्या रिकाम्या चौकांतून निर्हेतुकपणानें आणि दुर्मुखल्यावृत्तीनें उगीच त्यानें नियतकालिकाचीं पानें उलटलीं; नंतर संगीताच्या खोलींत जाऊन त्यानें तेथल्या पियानोवर एक गत वाजवण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या बोटांची तरलता गेली होती त्यामुळें गतीची लय त्याच्यांतून नीट उमटेना. पूर्णपणें नाराज होऊन त्याने आरामखुर्चींत अंग लोटलें आणि खिडकींतून बाहेर पाहूं लागला. रात्र पडत चालली होती आणि देवदारचे वृक्ष राखिया रंगाच्या धुक्यानें माखले जात होते. तब्बल एक तास संत्रस्त चित्तानें तो वाढत्या छायांकडे टक लावून बसला होता. शेवटीं त्यानें भोजनगृहांत जाण्याचें ठरविलें व तो उठला.

तेथें अवघींच मेजें मांडलेलीं होतीं; जेवायला बसलेल्या लोकांवरून त्यानें घाईघाईनें एक दृष्टि फिरवली. ओळखी देखीचें कुणीही माणूस दिसत नव्हतं. नाहीं म्हणायला एक ओळखीचा चेहरा दिसला. पण तो घोड्याच्या मोतद्दाराचा. माननेच त्याने त्याच्या सलामाचा स्वीकार केला. स्त्री तर एकहि नव्हती. मजेला निघालेल्या तरुणाचे चित्तरंजन

करील अशी एकहि वस्तु दिसत नव्हती तिथं. ती मुतकी स्थिति पाहून त्याचें डोकें पिकून गेलें.

रूप हेच कित्येकांचें भाग्य असतें आणि अशा लोकांत आपला बॅरन मोडत होता; त्याला पाहिलें कीं त्याच्याकडे कुणाचेही मन ओढले जाई. नवे अनुभव, नवीं साहसें याच्यासाठीं तो नेहमीं उत्सुक असे; त्याचा तोल कधींही जात नसे; कारण सुखाच्या संधीचा फायदा घ्यायला तो सदैव तत्पर असे. शृंगारसुखाचा सुगावा लागला म्हणजे त्याला सूचना देण्यासाठीं मदन नेहमीं त्याला सोबत करी. प्रत्येक स्त्रीकडे तो अशा कांहीं शोधक दृष्टीनें पाही कीं आपण विवस्त्र होत आहोंत असें तिला वाटावें; मग ती स्त्री आपल्या मित्राची पत्नी असो कीं दार उघडायला आलेली मोलकरीण असो.

अशा लोकांना स्त्रियांचे शिकारी असें म्हणण्याचा परिपाठ आहे आणि या म्हणण्यांत पुष्कळच तथ्य आहे कारण खरोखरच शिकाऱ्याच्या कित्येक प्रवृत्ती त्यांच्या ठिकाणीं दिसून येतात. उदाहरणार्थ, सावजाचा पाठलाग करण्याची वृत्ति, धावें रोखून त्याला बंदुकीच्या टप्यांत आणण्यांतला उन्माद, आणि त्याचा जीव घेण्याचा आनंद. अष्टौप्रहर ते शिकारीच्याच नादांत असतात आणि सावज हातांत येईपर्यंत त्याची पाठ सोडायला तयार नसतात. उन्मादानें ते सारखे जळत असतात. पण हा उन्माद प्रेमिकाचा नसतो तर तो द्यूतकाराचा थंड, दीर्घसूत्री आणि घातकी उन्माद असतो. त्यांची अख्खी हयात शृंगार साहसांतच तिन्ही त्रिकाळ व्यतीत होत असते. एकादा भुरटा अर्थपूर्ण कटाक्ष, एकादे सूचक स्मित, टेबलाजवळ गुडघ्याला घडलेला एकादा स्पर्श असल्या लहानसहान असंख्य

मादक शृंगारप्रसंगांनींच त्यांच्या आयुष्याचे दिवस जात असतात आणि अशा उन्मादांतच त्यांना जीवनाची कृतार्थता वाटत असते.

त्या रात्रीं बॅरनला त्याच्या आवडत्या खेळांत साथ करायला कुणीच तिथें नव्हतें; आणि त्याचा त्याला विलक्षण जाच होता. हातात पत्ते घेऊन भागीदाराची वाट पहात बसावं लागणं याच्यापेक्षां अधिक तापदायक असे द्यूतकाराला आणखी काय आहे? ओटोने वेटरला वर्तमानपत्र आणण्याबद्दल सांगितले. त्याने त्यातल्या मजकुरावरून व मथळ्यांवरून नजर फिरविली; पण त्याचे चित्त तिसरीकडेच होते. तो वाचीत होता खरा पण मद्यप्राशनानंतर यावी तशी त्याच्या मेंदूला बधिरता आली होती.

इतक्यांत त्याच्या मागे रेशमी झग्याची सळसळ झाली आणि किंचित् चढलेल्या पण सस्कारसंपन्न अशा नितळ आवाजातले उद्‌गार त्याच्या कानीं पडले.

"Mais tais-toi donc, Edgar!"—उंच सुंदर बांध्याची एक स्त्री त्याच्या जवळून निघून गेली. तिच्या मागून निस्तेज चेहऱ्याचा एक मुलगा आपल्या मद जिज्ञासू डोळ्यांनीं तिच्या सौष्ठवाचे मनांतल्या मनांत कौतुक करीत जात होता. तीं दोघे आपल्यासाठीं रिझर्व करून ठेवलेल्या टेबलाशीं जाऊन बसलीं. एडगर शिष्टाचार पाळण्याची शिकस्त करीत होता, पण तरीही त्याच्या काळयाभोर डोळ्यांतील ती अस्वस्थता त्याच्या खऱ्या भावनांचा परिस्फोट करीत होती. ती स्त्री—आणि तिनेंच बॅरनचे सारे लक्ष वेधून घेतले होते—अभिजात होती. आणि तिचे सारें प्रसाधन उच्च अभिरुचीचे दर्शक होतें. सौंदर्याचा असला नमुनाच बॅरनला विशेष आवडत असे. ती यहुदी स्त्री नुकतीच तारुण्यांतून

प्रौढत्वांत पदार्पण करीत होती. आणि जरी ती आपल्या विलासी वृत्ती-वर बाह्योपचारांनीं पांघरूण घाली तरी तिची भावनाक्षमता अजून ओसरली नव्हती. पहिल्या पहिल्याने तिची दृष्टिभेट त्याला घेतां येईना कारण तिनें बुद्धिपुरस्सर आपल्या पापण्या खालीं वळविल्या होत्या; पण तिच्या त्या धनुष्याकृति भिंवया, आकर्षक चेहऱ्याला उठाव देणारी ती जातिवंत यहुदी नासिका डोळे भरून पहायला त्याला भरपूर सवड होती. तिचा विपुल केशभारहि तिच्या अन्य अंगप्रत्यंगाप्रमाण अभिजात स्त्रीसौंदर्याने नटला होता आणि त्याच्या सुकुमार आणि वैभवसंपन्न कंपनानीं तिचा शिरोभाग झांकला गेला होता. नेहमीं सौंदर्याची चहा होत गेल्यामुळे रूपगर्वितेचा आत्मविश्वास प्राप्त झाल्याची साक्ष तिच्या ठिकाणीं स्पष्टपणें दिसत होती. तिचा आवाज किती नाजुक आणि मधुर आहे हें ती वेटरला हुकूम सोडताना किंवा कांट्या चमच्यांशीं खेळणाऱ्या मुलाला शिष्टाचाराची जाणीव करून देतांना दिसत होतें. आपल्याभोंवतीं काय चाललें आहे याकडे वरपागी दुर्लक्ष करीत ती बॅरनच्या सावध सौंदर्यसमीक्षणाकडे आपलें लक्ष नसल्यासारखे दाखवीत होती. पण त्याचे लक्ष स्पष्टपणें आपल्यावर लागलें आहे या गोष्टीच्या जाणिवेनें तिचे कुतूहल जागें झालें होतें. पण त्याच्यावरहि मोठ्या कौशल्याने तिने झांकण घातलें होतें.

बॅरनच्या मनांतलें मळभ कुठल्याकुठें वितळून गेले आणि त्याचा चेहरा उजळू लागला. दुर्मुखलेपणाच्या रेषा आठ्या त्याच्या मुद्रेवरून मावळूं लागल्या, त्याचे स्नायू उद्दीपित झाले, धमन्यांतून रक्त सळसळूं लागून त्वचेला तजेला चढला आणि त्याचे डोळे चमकूं लागले. पुरुषाच्या सान्निध्यांत जशी स्त्री उत्तेजित होऊन त्याच्या प्रेरणेला प्रत्युत्तर देते तसा तोही स्वभावांतल्या स्त्रीप्रवृत्तीमुळे तिच्या प्रेरणेला उत्तरें देऊं लागला.

शृंगारवृत्तीच्या उद्दीपनामुळें त्याच्या साऱ्या शक्ती उफाळून बाहेर येऊं लागल्या. सावजाची चाहूल लागताच शिकाऱ्याची गत व्हावी तशी त्याची स्थिति झाली. त्याच्या डोळ्यानीं तिच्या डोळ्याना आव्हान दिले. पण जरी तिनें त्याच्याकडे एक चोरटा कटाक्ष टाकला होता तरी त्याच्या डोळ्याला डोळा देण्याचे तिने टाळलें आणि आपणाला आव्हान स्वीकारायचें नाहीं असेच जणूं त्याला सागून टाकलें. तरीहि तिच्या जिवणीच्या कोपऱ्यावर स्मित लहरून गेलें असावे असा त्याला भास झाला. त्याला खात्री वाटेना. पण या गोष्टीमुळेंच ती त्याला जास्त उत्तेजक वाटली. तिनें मुद्दाम आपली दृष्टि टाळली ही गोष्टच त्याच्या दृष्टीनें आशादायक होती. 'चागलें लक्षण आहे हें.' तो मनाशीं म्हणाला, कारण त्याचा अर्थ जसा नकारात्मक करता आला असता तसाच ती भावावली आहे असाहि करतां आला असता. शिवाय, तिचे मुलाविषयींचें अगत्यहि इतकें रेखीव होतें कीं निश्चितपणें तें आपल्याकडे पहाणाऱ्यालाच उद्देशून असावें असे वाटावें. मुलाकडचें तिचे संभाषणहि स्वाभाविक नव्हतें; उलट तें आपल्याला न्याहाळणाऱ्या शेजाऱ्यालाच उद्देशून आहे असे दिसत होते. तिने बळें बळे आणलेला तो संयमच तिच्या अस्वस्थतेचा द्योतक आहे अशी बॅरनची भावना झाली.

त्याच्या भावना उत्तेजित झाल्या होत्या. शिकारीला सुरवात झाली होती. जेवण लाबवीत तब्बल एक तास तो तिच्यावर डोळे लावून बसला होता. त्याच्या मनांत तिच्या रूपाची रेष न रेष कोरून निघाली होती आणि तिच्या लावण्यसंपन्न देहाचा प्रत्येक कानाकोपरा गुप्तपणें त्यानें आपल्या डोळ्यांनीं कुरवाळून घेतला होता. पावसाच्या ढगांनीं आपले रक्षावर्ण भीषण हात पलीकडच्या अरण्यावरून फिरविले होते आणि त्यामुळें

त्यांतली झाडें भेदरून गेलेल्या मुलांप्रमाणें हुंदके देऊन रडत होतीं आणि गांवाची बाजू काळोखाच्या भीषण आवरणाखालीं झाकली गेली होती. खोलीतल्या सावल्या वाढत होत्या आणि टेबलाभोंवतीं बसलेल्या मंडळीवर जाचक निस्तब्धतेचा अधिकाधिक अमल चढत होता. या निस्तब्धतेच्या भाराखाली त्या स्त्रीचें मुलाकडचें संभाषण अधिकाधिक [illegible]कृष्ट आणि कृत्रिम होत चालले असून लवकरच ते संपुष्टांत येणार हें [illegible] ध्यानीं आलें. त्याला वाटले कीं एक प्रयोग करून पहावा. तो उठला आणि संथपणें चालूं लागून त्यानें खिडकीकडे पाहिले; तो तिच्याजवळून गेला पण तिच्याकडे न पहाता तो दिसेनासा झाला. पण एकाएकीं कांहींतरी विसरल्याचा बहाणा करीत तो परत फिरला. त्यानें तिला बरोबर पकडलें होतें कारण आपल्या पाठमोऱ्या आकृतीकडे अत्यंत उत्सुकतेनें पहात असतांना ती त्याला आढळली होती.

आपला प्रयोग असा यशस्वी झालेला पाहून बॅरनला हर्ष झाला होता आणि मधल्या दिवाणखान्यांत तो तिची वाट पहात होता. थोड्याच वेळात मुलाला हातांत धरून ती भोजनगृहातून बाहेर आली; दिवाणखान्यांतील मोठ्या टेबलाशीं पोंचल्यावर कांहीं मासिकांचीं तिने पानें चाळलीं आणि त्यांतलीं कांहीं चित्रें तिनें मुलाला दाखविलीं. वर्तमानपत्र वाचण्याचा बहाणा करीत सहज योगायोगानें पोंचल्याचें दर्शवीत बॅरन टेबलापाशीं आला पण खरं म्हटलं तर त्याची इच्छा तिच्या त्या पाणीदार डोळ्याचें दर्शन घेण्याची, जमल्यास एकाददुसरा शब्द बोलण्याची होती. तथापि, ती स्त्री त्याच्याकडे एकसुद्धा कटाक्ष न टाकता एकदम माघारी वळली. तिनें हलकेच मुलाच्या खांद्यावर चापटी मारली आणि प्रेमळपणाने त्याला म्हणाली, " Vieus, Edgar, Au lit ! "

थोडासा तेजोभंग होऊन ओटो तिची पाठमोरी मूर्ति पहातच राहिला. त्याच रात्रीं आपण तिची ओळख करूं अशी त्याची खात्री होती. ती टळल्यामुळे त्याची निराशा झाली. आणि तरीहि, त्याच्या दृष्टीनें, या घटनेला कमी रंजकत्व नव्हतें. आतां या साहसाला जोर चढला होता. प्रस्तुत घटनेनें त्याची वासना जास्तच वाढली होती.

त्याला वाटलें, खेळांतला भागीदार तर मिळाला आतां खेळाला सुरवात करायला हरकत नाहीं.

## मैत्री : : : : : : २

दुसरें दिवशीं सकाळीं बॅरन जेव्हां दिवाणखान्यांत आला तेव्हां त्या अपरिचित सुंदरीच्या मुलाकडे त्याचें लक्ष गेलें. कार्लमेच्या बालपुस्तकांतलीं चित्रें दाखवणाऱ्या दोघां लिफ्टवाल्यांशीं गप्पा करण्यांत तो रंगून गेला होता. त्याची आई त्याच्याजवळ नव्हती. अर्थात् ती स्वतःचा शृंगारसाज करण्यांत गुंतली असावी असा निष्कर्ष काढायला हरकत नव्हती. पहिल्या प्रथम आतांच त्याचें त्याच्याकडे सहेतुक लक्ष गेलें. तो बारा वर्षांचा दिसत होता पण नीट वाढ झाली नव्हती. त्याची वृत्ति संकोचशील आणि विवश होती आणि हावभावांत संगति नव्हती. त्याचे दोन काळेभोर डोळे मात्र इकडे तिकडे भिरभिरत होते. त्याच्या वयाच्या

मुखांप्रमाणें तो भेदरल्यागत दिसत होता आणि झोपेंतून अचानकपणें उठ-वून कोणीतरी त्याला अपरिचित प्रदेशांत आणून उभें केलें आहे असें वाटत होतें. त्याचें रूप अगदींच सामान्य होते असे नाहीं पण अजून त्याच्या नाका डोळ्याना नीटसपणा आला नव्हता; मागें पडणारें बाल्य आणि पुढें येणारें प्रौढत्व यांच्या सामन्याला नुकती कुठें सुरुवात होत होती; त्याच्या नाकाडोळ्यांना आकार होता पण निश्चितता आली नव्हती; मूर्ति घडवलेली असावी पण तिची रेखणी झालेली नसावी तसा काहींसा होता त्याचा चेहरा. शिवाय या विचित्र वयामुळें त्याचे कपडे त्याच्या अंगाला नीट बसत नव्हते. त्याचे काटकुळे हातपाय कसेतरी कपड्यांत गुंडाळल्या-गत वाटत होते; या सार्‍या गोष्टींमुळें बिचार्‍याचं रूप मुळींच डोळ्यात भरत नव्हतें.

त्या मुलाला पाहिलें कीं मनावर मोठा शोचनीय परिणाम होई. वरचेवर तो वाट अडवीत होता. एकदा दिवाणखान्यातला दरवान त्याला बाजूला काढी तर दुसर्‍यांदा तो फिरत्यादारात अडकला जाई. बाह्य जग त्याच्या बाबतींत उदासीन होतें. तेव्हां त्याची भरपाई तो हॉटेलच्या नोकराशीं निरर्थक बडबड करून करीत होता. सवड असली तर ते त्याच्या प्रश्नांना उत्तरें देत अन् काम निघालें म्हणजे त्याला सोडून निघून जात. बॅरन लक्षपूर्वक त्याच्याकडे पाहत होता. करुणेने त्याच्या ओठा-वर स्मित खेळू लागलें. तो गरीब बिचारा मुलगा उत्सुकतेनें प्रत्येक गोष्टीची पहाणी करीत होता. जिकडे तिकडे स्नेहशून्यतेनें त्याची संभावना होत होती. दुसर्‍या कुणाची शोधक दृष्टि त्याच्यावर गेली आणि तो पहाणी करतांना त्याला आढळला तर तो लाजेनें चुरमार होऊन जाई आणि त्याला मोठें दुःख होई. बॅरनला त्या मुलाची गंमत वाटत होती आणि

त्याचें त्याच्याविषयींचें कुतूहल वाढत चाललें होतें. नंतर त्याला एक कल्पना आली. या मुलाशीं मैत्री करून तिच्या जोरावर त्याच्या आईची ओळख करून घेतली तर! भ्रांतिमुळें हा मुलगा इतका बावरलेला दिसतो आहे. हरकत नाहीं. प्रयत्न करून पहायला काय जातं! हलकेच बॅरन् एडगरच्या मागून गेला. बाहेर तो गाडीच्या घोड्याच्या गुळाशीं नाकतुच्छ गंजारीत राहिला होता. या साध्यासुध्या क्रीडेच्या बाबतींतसुद्धा त्याचें नशीब ठीक नव्हतें. कारण तेथें गाडीवानानें त्याला घोड्याला उपद्रव न देण्याबद्दल समज दिली. रमून आणि कंटाळून जाऊन, काय करावें हे न कळल्यामुळें एडगर भकास मुद्रेनें तिथेंच घुटमळत राहिला.

बॅरननें या संधीचा फायदा घेतला आणि गमतीगमतीनें त्याला म्हटलें,

'छोटेराव, कशी काय आवडते ही जागा तुम्हांला! एडगर चमकला आणि लाजून लालबुंद होऊन गेला. संकोचानें विजारीवर त्यानें हात घासले. एका अपरिचित सद्गृहस्थानें आयुष्यात पहिल्यांदाच त्याला हे असें हटकलें होतें.

"खूप, थॅंक यू" एवढे शब्द कसेबसे त्याच्या तोंडून बाहेर पडले. पण शेवटचे शब्द त्याच्या गळ्यांतच राहिले होते.

"आश्चर्य आहे बुवा. मला तर हें अत्यंत नीरस ठिकाण वाटतें. तुझ्यासारख्याचा वेळ जायला इथं आहे तरी काय! तूं करतोस तरी काय सारा दिवस!"

अजून त्याचा संकोच गेला नव्हता त्यामुळें त्याच्याकडून चटकन उत्तर आलें नव्हतें. आजवर आपली कुणीच कदर केली नाहीं आणि हा गृहस्थ आपल्याविषयीं एवढें अगत्य दाखवितो हें कसें? तो लाजेनें अगदीं गोरामोरा झाला. पण त्याबरोबरच घडणाऱ्या गोष्टीचा त्याला अभिमान वाटत होता. धीर करून तो म्हणाला:

"मला पुस्तकें वाचायला आवडतात. शिवाय आम्हीं फिरायला जातों. कधीं कधीं गाडी करून जातों. मी आजारी होतों. तेव्हां माझी प्रकृति सुधारावी म्हणून आईनें मला इकडे आणलें. डॉक्टरच्या सल्ल्याप्रमाणें बराच वेळ मला उन्हांत बसावें लागतें."

बोलतां बोलतां त्याच्या स्वरांत आत्मविश्वासाची चमक दिसूं लागली. मुलांना जिवावरचें दुखणें येऊन गेलें म्हणजे तीं त्याचा मोठ्या अभिमानानें उल्लेख करीत असतात, कारण त्यामुळें आपल्या नात्यागोत्याच्या माणसांच्या दृष्टीनें त्यांना दुप्पट महत्व प्राप्त झाल्याचें कळून आलेलें असतें.

'खरंच. तुझ्या या वेळच्या प्रकृतीला ऊन फार पोषक आहे. चांगली गव्हासारखी कांति यायला पाहिजे तुला. तुझ्यासारख्यानं स्वच्छंदपणें धावलं पाहिजे, बागडलं पाहिजे आणि थोड्या उनाडक्याहि करायला पाहिजेत. तूं फार सालस दिसतोस एकंदरींत. आणि तुझ्या काखोटीच्या या ग्रंथामुळें तर शिष्ट दिसतोस अगदीं. तुझ्या एवढा होतों त्या वेळीं कसा पुंड असें मी! रात्रीं घरीं यायचा तो नेहमीं विजार फाटून घेऊन. असं इतकं सालस होणं काहीं ठीक नाहीं बुवा.'

एडगरला हसूं आवरेना. तो हंसला आणि त्यासरशीं त्याचा सारा संकोच कुठल्या कुठें नाहींसा झाला. बॅरननें पुढें केलेल्या स्नेहाचें तितक्याच

सौहार्दानें स्वागत करावें असें त्याला वाटत होतें पण तें फाजील धाडसाचें दिसेल अशी त्याला भीती वाटली. किती तल्लख आहे हा गृहस्थ! त्याच्याशीं बरोबरीच्या नात्यानें बोलणें मोठ्या भाग्याचं होतं. पण या सुखामुळेंच प्रयत्न करूनहि त्याची जीभ लुळी पडली होती. तें संभाषण चालू ठेवण्यासाठीं हवे असलेले योग्य शब्द मिळवण्यासाठीं त्यानें वाटेल तें मोल दिलें असतें! त्याच्या चित्तांत विचारांची एकच वावटळ उसळली होती. सुदैवानें त्या अणीबाणीच्या क्षणाला हॉटेल मालकाचा कुत्रा बर्टी तिथें हजर झाला आणि धावून त्यानें त्या मुलाला व बॅरनला हुंगलें. एडगरनें त्याला थापटलं, गोंजारलें. तें पाहून चटकन बॅरन त्याला म्हणाला:

'तुला कुत्रे आवडतात वाटतं?'

'खूप. बेडनला आजीकडे एक कुत्रा आहे. आम्हीं केव्हांतरी तिकडे गेलों म्हणजे सारा दिवस तो माझ्या मागून असतो. मोठा गमतीदार आहे तो. पण उन्हाळ्याच्या सुटीशिवाय तिथें जाण्याचा योग येत नाहीं.'

'माझ्याकडे कितीतरी कुत्रे आहेत. हवा असल्यास मी देईन तुला एक. त्याचा रंग तांबुस आहे आणि कान पांढरे आहेत. फारसा उंच नाहीं तो पण चांगला पढवलेला आहे. तुला आवडेल का तो?'

आनंदानें एडगरचा चेहरा लालबुंद झाला.

'निःसंशय' मनापासून तो उद्गारला. पण लगेच भानावर येऊन व गोरामोरा होऊन तो पुटपुटला: 'पण आई कबूल व्हायची नाहीं या

गोष्टीला. कुत्र्यांचा तिला कंटाळा आहे. निगा फार राखावी लागते त्यांची'

आपल्या इच्छेप्रमाणे संभाषणाचा ओघ आतां तिच्याकडे वळतो आहे हें पाहून बॅरनला आनंद झाला.

'फार कडक आहे वाटतं तुझी आई?'

एडगर थोडा विचारात पडला. त्यानें नजर वर करून त्याच्या-कडे पाहिलें आणि त्याच्यावर विश्वास टाकावा किंवा कसें या विषयीं विचार करीत त्यानें सावधपणानें उत्तर केलें.

'कडक असं कांहीं तिला म्हणतां यायचं नाहीं. मी आजारांतून उठल्यापासून ती माझं मन सहसा मोडीत नाहीं. तेव्हां कुत्राही घेऊं देईल कदाचित्......'

'मग मी तुझ्या वतीनें तिला तसं सांगूं का?'

'वा! तसं झालं तर छानच' तो आनंदानें ओरडला 'ती खास कबूल होईल. कसा आहे म्हणालात तो कुत्रा? पाढऱ्या कानाचा नाहीं का? वस्तुसुद्धा नेता आणतां येतात का त्याला?'

'तूं म्हणशील त्या गमती तो करील.'

मुलाच्या डोळ्यांत उडणारी ती चमक पाहून ओटोला आपल्या कुशलतेचा अभिमान वाटला. एडगरच्या मुद्रेवर आता संकोचाचे कसलेच चिन्ह उरले नाहीं. भीति आणि उत्कंठा यांच्यामुळे स्थगित होणारी त्याची स्वाभाविकता पाण्याच्या निर्मळ झऱ्याप्रमाणे नुसती उडूं जाऊं लागली.

त्याच्या नेहमींच्या अवघडलेपणाची जागा आता अनिर्बंध स्वाभाविकतेनें घेतली होती. याची आईसुद्धा अशी मुलासारखीच आंतून रसरशीत स्वभावाची असेल का ! बॅरननें मनात म्हटलं. यावेळीं एडगर त्याला एकामागून एक प्रश्न करू लागला.

“ त्याचं नांव काय ? ”

“ कारू ”

“ कारू, कारू ”

या नांवानें तो हुरळून गेल्यासारखा दिसत होता आणि अनपेक्षितपणें असा मित्र सांपडल्यामुळें त्याला आनंदाची धुंदी चढली होती. खुद्द बॅरनलाहि आपल्या या सुलभ यशाचा अचंबा वाटत होता. त्यानें ठरविलें कीं तवा तापला आहे तशी पोळी भाजून घ्यावी. त्याने एडगरला सहलीचें आमंत्रण दिलें. आणि कित्येक आठवडे कुणाचीच सोबत नसल्यामुळे या आमंत्रणामुळे त्याला इंद्रही ठेंगणा वाटूं लागला. त्यानें आपल्या जिभेला अनिर्बंध सोडलें व तो आपल्या नव्या मित्राच्या सगळ्या धूर्त साळसूद प्रश्नांना मोकळ्या मनाने उत्तरे देऊं लागला. त्याच्या कुटुंबाची हवी असलेली सगळी आवश्यक माहिती मिळवायला बॅरनला फारसा वेळ लागला नाहीं. त्याला कळलें कीं एडगर हा व्हिएन्नातील एका श्रीमंत आणि वरिष्ठवर्गीय वकीलाचा एकुलता एक मुलगा आहे. त्यानतर शिताफीनें त्यानें अशी माहिती मिळवली कीं त्याच्या आईला सिमरिंगचें वास्तव्य प्रिय नसून मनासारखी सोबत नसल्याची तिची तक्रार आहे. त्यानतर बेरकीपणानें त्यानें त्याला म्हटलें, “ तिचं फार प्रेम आहे

वटतं तुझ्या पपावर!" या प्रश्नाला उत्तर देतांना एडगरनें जी उडवा-उडवी केली तिच्यावरून पतिपत्नींत चांगलेसे सूत नाहीं असा त्यानें कयास बांधला व तो त्याच्या पथ्यावर पडला. आपलें बोलणें एका प्रौढ माणसाचें चित्त वेधून घेत आहे या कल्पनेनें एडगर त्याला आपलें हृद्गत खुल्या दिलानें सांगत होता. बॅरन अशा रीतीनें त्याच्याकडून माहिती काढून घेत होता पण तशा स्थितींतही आपण एका बालकाकडून त्याचीं गृहछिद्रें काढून घेत आहोंत याची त्याला शरम वाटत होती. एडगरचें बवान अंतःकरण अभिमानानें फुलून येत होतें. आणि विशेषतः चालतां चालतां जेव्हां त्याचा हात त्यानें प्रेमानें हातीं घेतला तेव्हां तर त्याचें अंतःकरण अभिमानानें जास्तच धडधडूं लागलें. चार माणसांदेखत एवढा मान आपणाला मिळत आहे या कल्पनेनें त्याला परमानंद होत होता. थोड्याच वेळांत त्याला आपल्या वयाचा विसर पडला आणि समवयस्क सोबत्याशीं बोलावें तसें तो त्याच्याशीं बोलूं लागला. एडगरच्या बोलण्या-वरून तो अत्यंत बुद्धिमान आणि थोडा अकाल प्रौढ दिसत होता. ज्या दुखणेकरी मुलाचा पुष्कळसा वेळ वयस्क माणसांच्या सहवासांत जातो त्याच्यांत ही गोष्ट विशेष दिसून येते. प्रीतीच्या किंवा अप्रीतीच्या बाबतींत मग ती व्यक्तीबद्दल असो किंवा वस्तूबद्दल असो-त्याची भावना अतिरिक्त होती. सुवर्णमध्य तो जाणतच नव्हता त्यामुळें कोणत्याही गोष्टीविषयीं तो बोलूं लागला म्हणजे त्याला आवेश चढे आणि या भावनावेगांत कित्येकदां त्याचा चेहरा आवळून येऊन विरूप दिसूं लागे. कधीं कधीं त्याच्या स्वभावांत वेडी अतिरिक्तता आढळून येई. त्यामुळें त्याच्या शब्दांना विलक्षण कडवेपणा येऊं लागे. त्याचा नेहमीचा बेडौलपणा हा अनावर भावनांची मुस्कटदाबी करीत राहिल्यामुळें आला असावा असें वाटत होतें.

अवघ्या अर्ध्या तासांत बॅरनने त्याचा विश्वास संपादन केला होता. एवढेंच नव्हे तर ते जिवंत रसरशीत बालहृदय अगदी त्याच्या हातांत आलें होतें. असल्या साध्या भोळया मुलांना जिकणे फार सोपे असतें कारण बिचाऱ्याचा स्नेह कुणालाच नको असतो. बॅरन आपल्या बाल्याशीं तद्रूप झाला आणि तेव्हाच्या गोष्टी बोलून त्यानें त्याला सहज सलगींत घेतलें. हां हां म्हणता तो सारा परकेपणा विसरून गेला आणि घरच्या माणसांशीं किंवा संवगड्यांशी बोलावें त्याप्रमाणे त्याच्याशीं बोलूं लागला.

अशा रीतीने त्या निर्जन स्थळी एक जिवलग दोस्त लाभल्यामुळे त्याला अस्मान ठेंगणे झालें होते. व्हियेन्नातले आपले दोस्त, त्यांचे किनरे आवाज आणि त्यांचीं तीं बिनकिमतीचीं बोलणीं या सगळयाचा त्याला तत्काल विसर पडला. एवंढच नव्हे तर त्याचे चेहरेसुद्धा त्याच्या स्मृति-पटावरून पुसले गेले. त्याच्या स्नेहाचे सारे धन आता त्याच्या या नव्या मित्राच्या मालकीचे झाले होते. शेवटीं निरोप घेताना जेव्हा त्याने त्याला दुसऱ्यादिवसाच्या सहलीसाठी आमंत्रण दिले तेव्हा तर अभिमानानें त्याची छाती फुटूं लागली. तो निरोपाचा क्षण त्याच्या आयुष्यात अत्यंत भाग्याचा होता. किती लवकर पण फसतात मुले. ... बॅरन मनात म्हणाला.

त्यानें पूर्व योजनेनुसार मध्यस्थ तर मिळविलाच होता. आतां तो हा सारा वृत्तांत निवेदन करून तिला भंडावून सोडील याबद्दल त्याची खात्री होती. संभाषणात आपण कौशल्याने पेरलेले तिच्या विषयींचे अर्थात् तिच्या सौंदर्याविषयींचे स्तुतिपर उल्लेख त्याला आठवले आणि त्यातला एकहि शब्द चुकूं न देता तो ते तिला पोचते करील या कल्पनेनें त्याला आल्हाद झाला. हा भावनोत्कट मुलगा आपणा दोघाना निकट

आणल्याशिवाय स्वस्थ बसणार नाहीं याची त्याला खात्रीच होती. आणि म्हणूनच स्वतः होऊन या बाबतींत पाऊल टाकावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें होतें. तो आतां आपल्या स्वप्नरंजनांत रंगून स्वस्थपणें समोरची वनश्री पहात राहिला होता कारण तो हे जाणून होता कीं त्या सुकुमार हस्तद्वयाच्या सेतूवरून आपणाला निश्चित तिच्या अंतःकरणांत प्रवेश मिळेल.

---

## त्रिवर्ग : : : : : : ३

काहीं तासांनंतर बॅरनची योजना कशी पूर्णांशांनीं सिद्धीस गेली हें यथाक्रम आतां दिसून येईलच. भोजनगृहांत यायला आज त्यानें मुद्दामच थोडा विलंब लावला. त्याच्यावर नजर जातांच एडगरने खुर्चीवरून ताडकन् उडी मारली आणि आनंदभरानें हंसत हंसत त्याला अभिवादन केलें. नंतर आईच्या दंडाला स्पर्श करीत तो उत्साहानें तिच्याशीं त्याच्याच गोष्टी बोलूं लागला. ती बिचारी लाजेनें व संकोचानें कावरीबावरी झाली होती. या अतिरिक्त भावनावेगाबद्दल ती मुलावर थोडी रागावली सुद्धां. तरीहि त्याला खुश करण्यासाठीं तिने त्याच्या मित्राकडे पाहिलें. या कटाक्षाचें निमित्त साधून बॅरननें तिला सन्मानपूर्वक अभिवादन केलें.

अर्थात् स्नेहाची रूपरेषा तयार झाली होती.

तिनें त्याच्या अभिवादनाचा साभार स्वीकार केला पण जेवण संपे-पर्यंत मान मुळींच वर केली नाहीं, तशीच त्याची आपली दृष्टादृष्ट होऊं दिली नाहीं. एडगर मात्र वरचेवर त्याच्याकडे पहात होता. एकदां तर त्यानें त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्नहि करून पाहिला. पण त्याच्या या गैरवर्तनाबद्दल त्याला आईकडून रागावून घ्यावे लागलें. जेवण झाल्या-नंतर 'चल, जाऊन झोप आतां' असें तिने त्याला सांगितलें. तरीहि बराच वेळ त्यानें तिच्यामागें कसली तरी भुणभूण लावली होती. शेवटीं एकदांची त्याला परवानगी मिळाली आणि त्याप्रमाणें आपल्या मित्राशीं दोन शब्द बोलण्यासाठीं तो त्याच्या टेबलाशीं गेला.

बॅरन त्याच्याशीं मनमोकळेपणाने बोलूं लागला तशी एडगरच्या डोळ्यांत नवी चमक दिसूं लागली. लगेच आपणाला परतायचें आहे याचें भान न राहून तो कांहीं क्षण तसाच त्याच्याशीं बोलत राहिला. इतक्यांत चातुर्यपूर्ण अभिनयाने चटकन् उठून तो तिच्या टेबलाशीं गेला आणि एडगरसारखा बुद्धिमान मुलगा लाभल्याबद्दल तिचें अभिनंदन करून त्याच्या सहवासांत घालवलेल्या रमणीय प्रभातकालाचा त्याने अभिमान-पूर्वक उल्लेख केला.

बॅरन एडगरविषयीं तिला एकामागून एक प्रश्न करूं लागला होता अन् एडगर ते आनंदानें आणि अभिमानानें लालबुंद होऊन ऐकत होता. या प्रश्नांच्या सरबत्तीखालीं काहींतरी उत्तर देणें तिला भागच होतें. अशा रीतीनें त्यांच्यांतलें संभाषण वाढत चाललें आणि अगदीं लुब्ध होऊन असीम आदरानें तो तें ऐकूं लागला. हळूहळू बॅरननें तिला स्वतःची ओळख करून दिली. त्यावेळीं 'बॅरन' या आपल्या बिरुदाचा तिच्या अभिमानी मनावर बराच परिणाम झाला हें त्याने ओळखलें.

ती त्याच्याशीं अत्यंत प्रेमळपणानें वागली पण तिनें कुठेंच आपणाला शद्वात सापडूं दिलें नाही. नंतर मुलांचे कारण दाखवून आपणाला लवकर निरोप घ्यावा लागत आहे याबद्दल तिनें खेद व्यक्त केला अन् ती जायला निघाली.

एडगरने, आपण बिलकूल दमलो नसून सगळी रात्र जागायची आपली तयारी आहे असें सागून जोरानें तिच्या म्हणण्याचा इन्कार केला पण तिनें निरोपादाखल आधींच हात पुढे केलेला होता. सन्मानपूर्वक तिच्या त्या हाताचें चुंबन घेऊन बॅरननें तिला निरोप दिला. त्या रात्रीं एडगरला नीट झोप लागली नाहीं. पहिल्या पहिल्यानें वडिलधाऱ्या माणसात बरोबरीच्या नात्यानें बोलाचालायला मिळाल्यामुळे त्याला जीवनात कसले तरी अपूर्व स्थित्यंतर घडल्यासारखे वाटत होतें. आणि अंत:करणांत बालिश हताशता आणि हर्ष याचा एकत्र कल्लोळ उसळला होता.

त्या सुशुप्तावस्थेत आपले बाल्य संपून आपण प्रौढावस्थेत आलो याची त्याला जाणीव झाली. त्याचे आयुष्य बहूतेक आजारात आणि एकाकीपणात गेल्यामुळे त्याला मित्र असा कुणी नव्हताच. प्रेमवृष्टि करण्याची भूक भागवायची ती आईबापावर व नोकरचाकरावर. पण आईबापांना त्याच्याकडे लक्ष द्यायला सवड होती कुठं? प्रेमाची विशालता मापणें नेहमीच मोठे कठीण असतें, आणि या मुलात तर ही दुरंत, निष्कलंक भावना केव्हांपासून सत्पात्र व्यक्ति दिसताच पूर्णपणें तिच्या स्वाधीन होण्याच्या आशेनें तिची वाट पहात राहिली होती.

आपल्या खोलींतल्या अंधारांत एड्गर सुखातिरेकानें गोंधळून गेला होता. अंतःकरणातले सुख अनावर होऊन त्याला हास्याच्या उकळ्या फुटत होत्या, रडण्याचे हुदके येत होते. कारण मित्र, आई, वडील यांपैकीं

कुणावरहि आतांपर्यंत त्याने इतके उत्कट प्रेम केले नव्हते. दोन तासापूर्वी ज्याचे नांव सुद्धा त्याला माहीत नव्हते त्या या माणसाला त्याने आपलें सारे भक्तिसर्वस्व अर्पण केले होतें.

या अनपेक्षित मैत्रीच्या अपूर्वाईने तो बिचकला नाहीं. कारण तसा तो हुषार होता. पण त्याला एक गोष्ट जाचीत होती आणि ती म्हणजे त्याची स्वतःचीच व्यर्थता.

' मी म्हणजे एक शाळेंत जाणारा पोर. रात्र पडताच झोपायला जाण्याबद्दल चार लोकादेखत मला हुकूम मिळतो. तेव्हां खरोखरच या थोर स्नेहाला मी पात्र आहे का ? माझा त्याना उपयोग काय ? त्यांना नजर म्हणून द्यायला मजकडे काय आहे ? या साऱ्या विचारांनीं त्याचे अतःकरण विदीर्ण होऊं लागलें. सामान्यतः त्याची अशी पद्धत होती कीं एखाद्या सवंगड्याशीं गट्टी जमली म्हणजे आपल्या भांडारातल्या एक दोन वस्तु त्याला द्यायच्याः अर्थात् त्या म्हणजे पोस्टाचीं तिकिटे आणि कांचमणी. पण कालपर्यंत त्याच्या दृष्टीने अत्यंत मूल्यवान असलेल्या या जिनसा आज त्याला अगदींच क्षुद्र आणि निरुपयोगी वाटूं लागल्या होत्या.

ज्याच्याशीं बहुमानार्थी संबोधनाशिवाय बोलतां येत नाहीं त्या या सन्मान्य मित्राला असल्या क्षुद्र जिनसा नजर करायच्या कशा ? बरं, आपलें प्रेम व्यक्त करण्यासाठीं दुसरा उपाय तरी कोणता काढायचा ? त्याला कांहींच सुचेना. त्याला आपल्या बालवयाची भयंकर चीड आली आणि त्यानें त्याला खूप शिव्याशाप दिले. केव्हा एकदां आपण मोठा होईन अशी दुर्निवार तळमळ त्याला लागून राहिली.

अमळशानें हे त्याचे विचार त्याच्या रंगीबेरंगी स्वप्नसृष्टींत अंतर्धान पावले आणि उद्यांच्या सहलीच्या सुखकारक विचारांत शेवटीं त्याला झोंप लागली. साडेसातच्या सुमारास तो दचकून जागा झाला. आपणाला पोंचायला उशीर नाहीं ना होणार अशी त्याला भीति वाटली. त्यानें घाईघाईनें कपडे केले आणि आईला 'गुड मॉर्निंग' करण्यासाठीं तो तिच्या खोलिकडे गेला. त्याला इतक्या लवकर उठलेला पाहून ती आश्चर्यानें थक्कच झाली. कारण रोज बाबापुता करून त्याला तिला उठवावें लागत असे. ती त्याला कांहीं तरी विचारणार होती पण तो केव्हाच जिना उतरून गेला होता. आपल्या मित्राला आपल्यासाठीं तिष्ठत रहावें लागू नये एवढ्याच साठीं नऊ वाजेपर्यंत चहा घ्यायचें विसरून तो सारखा इकडून तिकडे येरझारा घालीत होता.

शेवटीं साडेनवाला बॅरनची स्वारी मंद पावलांनीं तिकडे येत असलेली त्याला दिसली. अर्थात् पूर्व दिवशींच्या बेताचा त्याला पूर्ण विसर पडला होता. पण अत्यंत उत्कंठेनं आणि हसतमुखाने एडगरला जवळ येताना पाहून त्याने त्याला दिलेले वचन पाळावयाचे ठरविले. एका हाताने त्याचा खांदा आवळून धरीत तो इकडून तिकडे फिरूं लागला. सहलीला निघायची एडगरने त्याला निकड लावली होती पण गोड गोड बोलत आग्रहाने तो ते लांबणीवर टाकीत होता. त्याची अस्वस्थ दृष्टि वरचेवर दाराकडे जात होती. त्यावरून कसली तरी तो वाट पहात आहे असें दिसत होतें. अकस्मात् तो बसलेल्या खुर्चीवरून उठला. एडगरची आई दिवाणखान्यांत आली होती. तिने बॅरनच्या अभिवादनाला प्रत्याभि-वादन केलें आणि प्रेमळपणानें ती त्यांच्याजवळ आली.

सहलीचा बेत कळल्यावर एकाद्या बहुमोल रत्नाप्रमाणे एडगरनें आपल्यापासून ही गोष्ट कशी लपवून ठेवली होती हे आठवून ती हंसली.

तो कार्यक्रम तिला पसंत पडला असें पाहून बॅरननें तिलाहि बरोबर येण्या-बद्दल विनंति केली आणि ती तिनें मन:पूर्वक मान्य केली.

हें पाहून एडगरनें वैतागून जाऊन मनांतल्या मनांत दात ओंठ चावले. त्याला वाटले, आपल्या दुर्दैवानेंच तिला तिकडे येण्याची बुद्धि झाली. त्याच्या दृष्टीनें ती सहल केवळ त्याच्यासाठीं मुक्रर झाली होती. केवळ शिष्टाचार म्हणून आपल्या मित्राशीं त्यानें आपल्या आईचा परि-चय करून दिला होता, तिनें त्याचे साहचर्य संपादन करावे म्हणून नव्हे. अशा विचारांत असतानाच बॅरन तिच्याशीं फार स्नेहार्द्रानें वागत असल्याचें पाहून एडगरच्या मनांत कसली तरी मत्सरसदृश भावना उगम पावूं लागली.

काहीं वेळानें तीं तिघेंही फिरायला गेलीं.

आपणाला येत चाललेल्या महत्वामुळें आकस्मिकरीत्या प्राप्त झालेली एडगरची स्वत:विषयींची महत्वभावना वाढत होती. उभयतांच्या संभाषणाचा एकमेव विषय तोच होता. मुलाच्या विवश आणि भीतिग्रस्त स्वभावाविषयीं ती साशंकतेनें बोलत होती तर बॅरनला त्याचा हा विशेषच जास्त स्पृहणीय वाटत होता.

अशी सुंदर घटका एडगरला कधींच लाभली नव्हती एवढेंच नव्हे तर साऱ्या हयातींत एवढ अधिकारहि त्याला कधींच मिळाले नव्हते. वाटेल तेव्हां त्याला संभाषणात भाग घेता येत होता आणि कुणी चूप बसवील अशी भीति बाळगावी लागत नव्हती. तसेच आपल्या सर्व प्रकारच्या इच्छा बोलून दाखवतां येत होत्या. हेच त्यानें यापूर्वी केले

असते तर या त्याच्या इच्छांना तिथल्या तिथें वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या असत्या.

या गोष्टींमुळे आपण प्रौढ झाल्याची भ्रामक समजूत त्याच्या मनांत दृढमूळ होत गेल्यास आश्चर्य नव्हतें. साहजिकच अंगात नीट न बसणारे जुने कपडे बाजूला टेवण्यांत यावे त्याप्रमाणें त्याच्या सगळ्या बालिश कल्पना आता मागें पडल्या होत्या.

दुपारी एडगरच्या आईच्या आमंत्रणाला मान देऊन तो तिच्या टेबलावर जेवायला बसला होता. तिची त्याच्याकडची वागणूक दिवसें दिवस जास्त जास्त स्नेहपूर्ण होत चालली होती.

समोरासमोर बसण्याऐवजीं आता तीं शेजारींशेजारीं बसूं लागलीं होतीं. अर्थात् परिचयाचें रूपांतर स्नेहांत झाले होतें. त्रिवर्गानें म्हणावयाचें संगीत सुरू होण्याच्या बेतांत आलें होतें आणि तो पुरुष, ती स्त्री आणि तें बालक या तिघांच्याहि आवाजांच्या तारा एकाच सुरांत लागल्या होत्या.

---

## हल्ला : : : : : : ४

सावज आवाक्यांत आलें असून चोरपावलानीं जास्त जवळ जाण्याची वेळ आतां आली आहे हें त्या अधीर शिकाऱ्यानें ओळखलें होते आणि म्हणूनच तें त्रिवेणी संगीत त्याला त्रासदायक होत चाललें होते. वस्तुतः त्या तिघांनीं असे बोलत रहाणें किती आल्हादकारक होते पण संभाषण हा कांहीं त्याचा खरा हेतु नव्हता. असल्या संभाषणांत शिष्टपणाचा बुरखा

घ्यावा लागल्यामुळे कामी स्त्रीपुरुषांमधल्या इच्छित क्षणाला विलंब लागतो आणि पर्यायाने झडप घालण्याचे साहस करायला संधि मिळत नाहीं हें त्याला चांगलें माहित होतें. बोलणे चाललें असताना तिलाहि त्याच्या या हेतूचें विस्मरण घडलें नसावे. कारण तिनें खात्रीनें तो ओळखला होता. या विषयीं आता शंकेला मुळींच जागा राहिली नव्हती. इतकेंच नव्हे तर तिच्या बाबतींत चाललेले त्याचे प्रयत्न वाया जाणार नाहींत अशी शक्यताहि आतां दिसूं लागली होती. स्त्रीच्या जीवनांत अशी एक निर्णायक वेळ येऊन ठेपते कीं ज्यावेळीं ज्याला पूर्णपणे स्वतःचे अंतःकरण देतां आलें नाहीं अशा पतीशीं एकनिष्ठा राहिल्याबद्दल तिला पश्चात्ताप होत असतो. त्यावेळीं जगायचें ते स्त्री म्हणून कीं माता म्हणून याची त्वरित निवड करण्याची आणखी एक पण शेवटची संधि तिचे मावळतें लावण्य तिला देत असतें. हा आणीबाणीचा समय एडगरच्या आईच्या आयुष्यात आज आला होता. आपल्या जीवनाची साध्यनिश्चिति ठरून गेली आहे असें केव्हांपासून तिला वाटत होतें. पण आज एकाएकीं एक प्रश्नचिन्ह तिच्यापुढें उभें झालें होते. प्रणयी आयुष्यक्रमाची आशा आणि कायमची विरक्ति या दोन गोष्टींमध्यें तिच्या अंतःकरणाची चुंबकटाचणी शेवटच्या खेपेचे हेलकावे खात होती. जगायचं तें स्वतःसाठीं कीं मुलासाठीं, स्त्री म्हणून कीं आई म्हणून या प्रश्नाचा शेवटचा गंभीर निर्णय घेणें आता तिला भाग होतें.

जीवनासक्ति आणि त्याग यांच्यामध्यें सांपडलेल्या तिच्या मनाची ही द्विधावस्था बॅरननें अचूक ओळखली होती कारण असल्या गोष्टींत तो आतां तरबेज झाला होता.

संभाषणांत चुकूनहि कुठें तिनें पतीचा उल्लेख केला नाहीं यावरून तिच्या व्यावहारिक गरजा पुरवण्यापलीकडे तिच्याकडे त्याचें फारसें लक्ष

नसावें हे उघड दिसत होते. वैभव आणि प्रतिष्ठा यांच्या मरातबांत मुला-कडे लक्ष द्यायला तिला फुरसत नसावी कारण त्याच्या अंतर्जीवनाची दखल असल्याचे तिच्या बोलण्यावरून तरी दिसत नव्हतें. या असल्या जीवन-क्रमामुळें तिच्या काळ्याभोर डोळ्यात विषाद आणि उबग यांची पुसट झाक तरळत होती. तिचें जीवन आतून कसें काळवंडून गेलें आहे आणि भावनांची तरलता कशी नष्ट होत चालली आहे याची ती स्पष्ट साक्ष होती. वेळ न गमावता तावडतोब प्रयत्नाला लागायचें पण आपणाला घाई आहे हें तिला दिसूं द्यायचे नाहीं असे त्याने ठरविले होतें. गळ ओढणाऱ्या कोळ्याच्या सावधगिरीनें साऱ्या गोष्टी करावयाच्या असा त्याचा निश्चय होता. वस्तुतः त्याची भूमिका जिंकणाऱ्याची होती पण जिंकण्याचा प्रयत्न तिच्याकडून व्हावा यासाठीं तो त्या स्नेहाला दर्शनी उदासीनतेनें झाकूं पहात होता. त्यानें ठरविलें कीं थोडेसें ताठ्यानें वागून तिला आपल्या व तिच्यामधील सामाजिक दर्जातील अंतर जाणवा-वयाचें. केवळ आपल्या सरदारी नावाच्या आणि मोजक्या शिष्टाचारांच्या दिमाखानें तो सुंदर देह हस्तगत करण्याची कल्पना त्याला दिपवून सोडीत होती.

हा डाव त्याला उत्तेजित करीत होता आणि त्याच्या वाढत्या उत्तेजनामुळे पूर्वी सारखें जागरूक रहाणें त्याला कठीण होऊं लागलें होतें. आपली वाट तीं दोघें कशा उत्कंठेने पहात असतील आणि आपली अनुपस्थिति त्यांना कशी जाणवत असेल या रम्य विचारांत बॅरननें सगळी संध्याकाळ आपल्या खोलींतच घालवली. त्याची ही अनुपस्थिति लक्षित व्यक्तीला जाणवली कीं काय कोण जाणे. बिचाऱ्या एडगरची स्थिति मात्र मोठी अनुकंपनीय झाली. आपल्या मित्राच्या अभावीं त्याला परित्यक्त

वाटत होतें आणि काय करावें हें कळत नव्हतें. भावडेपणानें किती तरी तास तो सारखी त्याची वाट पहात बसला होता.

आपण एकट्यानें बाहेर पडणें किंवा कोणत्या तरी अन्य उपायानें स्वतःची करमणूक करून घेणें हें त्याला बेइमानीपणाचें वाटत होतें. तो व्हरांड्यातून इतस्ततः भटकत होता आणि जसजसा उशीर होत होता तसतसें त्याचें अंतःकरण अधिकाधिक कष्टी होत होतें. बॅरनला एखादा अपघात झाला नसेल ना किंवा आपल्याकडून त्याचें मन दुखःवलें नसेल ना अशा भलभलत्या कल्पनांनीं अस्वस्थ आणि भयभीत होऊन तो रडकुंडीत आला होता.

जेवणाच्या वेळीं बॅरन दिवाणखान्यांत आला त्यावेळीं एडगरनें मोठ्या आनंदानें त्याचें स्वागत केलें. आईच्या इशाऱ्याची किंवा इतराच्या विस्मयाची पर्वा न करतां धावतच तो त्याच्याशीं गेला आणि आपल्या कृश हातानीं त्यानें त्याला कडकडून आलिंगन दिलें.

—आपण होता कुठं सारा वेळ? त्यानें लगेच त्याला विचारलें—किती किती शोधलं आम्हीं तुम्हाला !

अशा रीतीनें झालेला आपला उल्लेख न आवडून एडगरची आई गोरीमोरी झाली आणि बऱ्याच कठोरपणानें म्हणाली,

Socs–Sage Edgar–Assieds–Loi.

फ्रेंच भाषा तिला फारशी अवगत नव्हती. एवढेंच नव्हे तर फ्रेंचमधून फार वेळ संभाषण करणें तिला जमत नव्हते. तरीहि मुलाशीं ती फ्रेंचमधूनच बोलत असे. एड्गरनें आईची आज्ञा पाळली. पण बॅरनला प्रश्न विचारायचें सोडलें नाहीं.

—रुचेल त्याप्रमाणें वागायला त्यांचे ते मोकळे आहेत हें तूं विसर तोस, एडगर. कदाचित आपला सहवास आवडत नसेल त्यांना.

यावेळीं 'आपला' या शब्दांत तिनें आपण होऊन स्वतःचा अंतर्भाव केला होता. ते पाहून बॅरनला आंतल्याआंत आनंद झाला कारण या लटक्या रागातच प्रेमयाचनेची अपेक्षा अभिप्रेत होती.

या वाणीवेसरशीं त्याची मृगयावृत्ति खडबडून जागी झाली. सावज गोळीच्या टप्प्यांत आल्याचें स्पष्ट चिन्ह त्याला सांपडलें होतें. त्यामुळें उत्साहानें त्याला हळूहळू नशा चढूं लागली. हां हां म्हणतां त्याचे डोळे चमकूं लागले. धमन्यांतून रक्त वेगाने खेळूं लागलें आणि अभावितपणें शब्दांचा प्रवाह त्याच्या मुखावाटें ओसंडू लागला.

पुष्कळसे नट असे असतात कीं त्यांना समोरचा प्रेक्षक समुदाय संपूर्णपणें हुकमतींत आल्यावरच खरा रंग चढतो. आपला बॅरनही अशाच वृत्तीचा मनुष्य होता. स्त्रियांना रिझवण्याच्या कलेत तो निष्णात होता आणि त्याच्याशीं बोलतां बोलतां रंग चढून त्याचे व्यक्तित्व दुप्पट प्रभावानें तळपूं लागे. सुस्पष्ट आणि सरस उपमा दृष्टातानीं कोणतीही गोष्ट खुलवून सांगण्यांत त्याचा अगदीं हातखंडा होता. त्यात आज नूतन स्नेहाच्या सन्मानार्थ नेहमींपेक्षां त्यानें शाम्पेनचे चार दोन पेले जास्त घेतल्यामुळें त्याला नशा चढली होती. एका इंग्रज अंमलदार मित्राचा पाहुणा म्हणून हिंदुस्थानांत असतांना आपणास पहायाला मिळालेल्या शिकारीच्या गोष्टी त्यानें काढल्या होत्या. त्यानें मुद्दामच मोठ्या धूर्तपणानें हा विषय काढला होता. कारण जें जें काही लोकविलक्षण आणि दुर्लभ असेल त्यानें त्यानें ती उत्तेजित होते हे त्यानं ओळखले होते. एडगर तर त्या ऐकून अगदीं

आश्चर्यमूढ होऊन गेला होता. उत्साहातिरेकानें त्याचे डोळे नुसते जळत होते. तहानभूक विसरून तो सारखा बॅरनवर डोळे लावून बसला होता. वाघांची शिकार, सावळ्या वर्णाचे हिंदु लोक, सहस्रावधि लोकांचा चुराडा उडवीत जाणारा जगन्नाथाचा भयंकर रथ असल्या असामान्य गोष्टी त्यानें फक्त पुस्तकात वाचलेल्या होत्या. त्या प्रत्यक्ष पाहिलेला मनुष्य व्यवहारात असूं शकतो याची त्याला बिलकूल कल्पना नव्हती.

पुराणांतल्या देशांप्रमाणें असले लोकहि प्रत्यक्ष सृष्टींत वावरत नाहींत अशीच आजवर त्याची समजूत होती. पण आज पहिल्याप्रथम त्यांचा खरेपणा पटल्यामुळें त्याचे अंतःकरण सद्‌गदित झालें होते. त्याचे डोळे आपल्या मित्रावरून मुळींसुद्धां हलत नव्हते आणि श्वास आवरून समोर दिसणारे त्याचे ते वाघाला मारणारे हात तो टक लावून पहात होता. इच्छा असूनहि त्याला प्रश्न विचारण्याचें धाडस होत नव्हते. आणि यदाकदाचित त्यानें तसा प्रयत्न केला तर त्याच्या स्वरांत विलक्षण कंप निर्माण होई. चपल कल्पकतेचे देणें लाभल्यामुळें कोणत्याहि गोष्टी त्याला चित्ररूपानें दिसूं लागत. तशी हीहि गोष्ट त्याला दिसूं लागली. लाल पोषाखाचा माहूत असलेल्या हत्तीवर आपला मित्र बसला आहे, उभय बाजूनीं, भर्जरी मुंडासे बांधलले सिद्धी चालले आहेत. नंतर अकस्मात वाघ दांत विचकत हळूहळू पुढे होऊन हत्तीच्या सोंडींत आपलीं नखें खुपसीत आहे असा चित्रपट त्याच्या डोळ्यांसमोरून जात होता.

नंतर बॅरननें आणखीहि कांहीं चित्तवेधक गोष्टी सांगितल्या. त्यातहि माणसाळलेल्या आणि म्हाताऱ्या हत्तीकडून जवान आणि मस्त हत्ती कसे धूर्तपणाने पकडतात तेंहि त्यानें सांगितले. ते ऐकतांना मुलाच्या डोळ्यांतून

नुसत्या ठिणग्या उसळत होत्या. इतक्यांत घड्याळांत पाहून आई त्याला म्हणाली

—Neuf heures ! Au lit !

हा हुकूम ऐकल्याबरोबर त्याला वीज पडल्यासारखें झालें. तो एक-दम पांढरा पडला. झोंपायला जाण्याबद्दलचा हुकूम सगळ्याच मुलांना भयंकर वाटतो. कारण याच गोष्टीमुळें प्रौढ माणसांदेखत त्यांचा जास्त अपमान होत असतो. एडगरला तर या क्षणीं हा उपमर्द जास्तच भयंकर वाटला कारण असल्या अद्भुत गोष्टी ऐकण्याची आई त्याला मनाई करीत होती.

—आई, तेवढी हत्तीची गोष्ट ऐकूं दे ना मला !

तो थोडा हट्ट धरणार होता पण आपणाला नुकत्याच प्राप्त झालेल्या प्रौढपणाचा दर्जा आपण सांभाळला पाहिजे हें त्याच्या ध्यानीं आलें तरीहि धीर करून आणखी एकदां त्याने प्रयत्न करून पाहिला.

पण तेवढ्यांत ती जास्तच कठोर झाली आणि म्हणाली :

—एडगर, बराच उशीर झाला आहे. जाऊन झोंप आतां. बॅरन सांगतील त्या गोष्टी मी मागाहून तुला सांगेन. एडगरचे चित्त चलबिचल झालें. झोंपायला जातांना नेहमीं आई त्याला सोबत करीत असे; तरीहि आपल्या मित्रासमक्ष ‘ तूं ये ’ अशी विनंति त्याच्याने तिला करवेना. जातांना अंतर्यामीं त्याला कष्ट होत होते पण स्वाभिमान आड आल्यामुळें स्वेच्छेनेच आपण जात आहों असें भासविण्याचा तो प्रयत्न करीत होता.

—खरोखर मागाहून सगळ्या गोष्टी सांगशील ना मला ! अगदीं सगळ्या ! हत्तीची गोष्ट सुद्धां !

–हो. हो. सांगेन हं.

–आजच ? आणखी थोड्या वेळानें ?

–हो. हो. पण आतां जाऊन झोप कशा. चल. जा. जा लवकर. त्याचा कंठ दाटून आला होता. निरोपादाखल आईशीं अन् बॅरनशीं हस्तांदोलन करताना आपणाला रडे कसें कोसळलें नाहीं याचा त्याला स्वतःलाच अचंबा वाटला.

बॅरननें प्रेमळपणानें त्याचें मस्तक कुरवाळलें आणि त्यासरशीं त्याचा मुखडा स्मितानें उजळून निघाला. पण तितक्यांत तो तेथून पळाला, नाहीं तर त्याच्या डोळ्यांतून ओघळणारे अश्रूंचे सर त्यांना दिसले असते.

---

## हत्ती : : : : : : ५

एडगरची आई आणि बॅरन अजून टेबलाशींच होती. मात्र शिकारीच्या किंवा हत्तींच्या गोष्टी तेवढ्या बंद पडल्या होत्या.

एडगर गेल्यापासून त्यांच्या बोलण्याला शैथिल्य आल्यासारखें, कुठें तरी आडकाठी उद्भवल्यासारखें वाटत होतें.

नंतर तीं हॉलमधे गेलीं आणि तेथेंच एका कोपऱ्यांत जाऊन बसलीं. बॅरनची मुद्रा आज विलक्षण मोहक दिसत होती. शाम्पेनमुळें तीहि थोडी उल्हसित झाली होती. त्यामुळें लवकरच त्यांच्या संभाषणाला अनिष्ट वळण मिळालें. खरें म्हटलें तर, बॅरन सुंदर होता, असें काहीं म्हणतां आलें

नसते. केवळ तो तरुण होता, दृष्टी पाणीदार होती आणि चेहरा निमगोरा आणि तरतरीत होता एवढेंच. त्यानें केस अगदीं पातळ राखले होते आणि त्याची सारी मोहकता त्याच्या तरतरीतपणात होती. त्याचें सान्निध्य तिला आतां प्रिय होत चाललें होतें आणि त्याच्या दृष्टीच्या बाबतींतलें तिचें भय ओसरलें होतें. हळूहळू त्याच्या बोलण्यांतून धिटाई प्रगट होत चालली आणि हें पाहून ती किंचित् पेंचांत पडल्यासारखी झाली. आणि तिला वाटूं लागलें कीं कुणीतरी आपले अंग आवळीत, कुरवाळीत आहे—त्या-सरशीं कसल्या तरी अगम्य वासनेच्या आहारी जाऊन ती लाजेनें शरमिंदी झाली. पण इतक्यांत तो अत्यंत बालिशतेनं अन् मोकळेपणाने हंसूं लागला आणि त्याचे शब्द निष्कपट थट्टेचे दिसूं लागले.

कधीं कधीं त्याच्या एकाद्या शब्दाला विरोध करावा असे तिच्या मनात येई. पण ती जात्याच 'प्रणयपिपासू' असल्यामुळें या चिमुकल्या गोष्टींनी ती आनंदित होत होती. त्या साहसी क्रीडेंत रमतां रमता शेवटीं तीहि त्याचें अनुकरण करूं लागली. शब्द आणि आविर्भाव या उभय साधनांनीं त्याच्या आधीन होऊन त्याला ती अधिकाधिक निकट येण्याची मुभा देत होती. आणि अशा रीतीने आशेचीं पाखरे त्याच्या डोळ्यांपुढें सदैव खेळत ठेवीत होती. त्याचा आवाज आता तिला अगदीं जवळून ऐकूं येऊं लागला होता आणि त्याच्या गरम गरम श्वासाचें स्पंदन तिच्या खांद्याला जाणवत होतें. गोष्टीच्या रंगात द्यूतकारांप्रमाणें त्याचें वेळेचें भान नष्ट झालें होतें. मध्यरात्र उलटून जेव्हां दिवाणखान्यांतलें दिवे विझत चालले तेव्हां कुठें तीं भानावर आलीं.

वाजवीपेक्षा जास्त पुढें गेल्याची जाणांव होऊन ती स्त्री सहज प्रेर-णेनें एकदम उठली. विस्तवाशीं खेळण्याचा तिला सराव नव्हता असें

नव्हे पण आता हा खेळ कदाचित आपल्या अंगावर उलटेल असे तिला वाटूं लागलें होतें.

आपला स्वतःवरचा ताबा उडाला असून अंगातून कसलीशी मादक संवेदना सळसळून उठत आहे या जाणिवेने ती घाबरून गेली. भीति, शाम्पेन आणि उत्तेजक सुखशब्द यानीं तिच्या मस्तकात एकत्र कल्लोळ उडवून दिला होता; कसल्या तरी अर्थशून्य, वेडपट धास्तीने ती झपाटली गेली होती. असली भीति आयुष्यात, आगीत्यागीच्या अनेक प्रणय प्रसंगात तिच्या प्रत्ययास आली होती. पण तिची इतकी तीव्रता तिला यापूर्वी कधींच जाणवली नव्हती.

–गुड नाइट, गुड नायट, टिल् टुमॉरो–असें म्हणत ती तेथून निसटूं पाहूं लागली, कारण त्याच्यापेक्षा त्या क्षणाची आणि स्वतातल्या आत्मविश्वासाच्या विचित्र अभावाचीच तिला जास्त धास्ती वाटत होती.

पण तिनें निरोपादाखल पुढें केलेला हात बॅरनने गोड बळजबरीनें पकडून धरला आणि केवळ एकदाच विनयाने त्याचे चुंबन घेऊन न थांबता बोटाच्या टोकापासून मनगटापर्यंत त्याने पांचदा त्याचें चुंबन घेतलें. त्याच्या मिशाच्या खरखरीतपणामुळे तिच्या हाताच्या पृष्ठभागाला मधुर गुदगुदल्या झाल्या आणि अगात अस्पष्ट हुडहुडी भरल्यासारखे होऊन तिची देहलतिका कंपायमान झाली. रक्ताचा ताप आणि दाब वाढून ते तिच्या नसानसातून धावूं लागलें आणि भयकर भीतीनें तिच्या कानशिलांत घण बसूं लागले. ज्वालात सापडल्यागत होऊन तिचे मस्तक पेट घेत होतें. भयचकित झाल्यामुळें तिचें सर्वांग धडधडूं लागून तिचा हात झटकन् मागें सटकला.

--इतक्यांत नको जाऊंस...बॅरन हळूच म्हणाला.

तेवढ्यांत घाईघाईनें ती बाजूला झाली. ती संकोचली होती, भ्याली होती.

बॅरनला चाळवायला हव्या असलेल्या उन्मादावस्थेंत आपण सांपडलों आहों हे तिला कळत होतें. हा पुरुष आपला पिच्छा पुरवीत शेवटीं आपणाला पकडील ही क्रूर भीति तिला मागें लोटीत होती. पण त्याच्या-पासून दूर होत असताना तसा प्रयत्न तो करीत नाहीं म्हणून तिला वैषम्य वाटत होतें. अभावितपणें ज्या गोष्टीची ती इतकीं वर्षे वाट पहात होती ती या क्षणीं घडणें शक्य होतें. त्या साहसाचा निकटवर्ती दर्प तिला मोह घालीत होता. आतापर्यंत प्रणयक्रीडेच्या महनीय आणि प्राणघातक खेळांत अगदीं शेवटच्या क्षणाला तिनें स्वतःला सावरलें होतें.

पण बॅरन मोठा मानी होता. सुलभ क्षणाचा फायदा घेणें त्याला मान्य नव्हतें.

स्वतःच्या विजयाची पूर्ण निश्चिति असल्यामुळें नशेच्या आणि विकलतेच्या क्षणात सापडलेल्या स्त्रीला बळजबरीने ताब्यात घेणें त्याला कमीपणाचे वाटत होतें. उलट, ती पूर्ण शुद्धींत असताना तिच्याशीं झुंज खेळत तिची शरणागति घडवून आणावयाला त्याला हवी होती. तो प्रणयप्रातांतला जुगारी होता खरा. पण सच्चा जुगारी होता आणि ती त्याच्या तावडींतून आतां निसटणे अशक्य होतें.

त्या स्त्रीच्या रक्तात आतां गरम गरम विष खेळूं लागल्याचें बॅरननें चांगलें ओळखलें होतें. जिना चढून गेल्यावर ती थांबली आणि तिनें आपलें धापणारें वक्षस्थल दोन्हीं हातानीं दाबून धरलें. दम घेण्यासाठीं क्षणभर तिला थांबावें लागलें. तिचें त्राण गळत चाललें होतें. 'सुटली एकदाची संकटातून' असे वाटल्यामुळें किंवा तशी समजूत करून घेतल्यामुळें

तिच्या काळजांतून एक उसासा बाहेर पडला पण संमूढावस्थेत सांपडल्या-प्रमाणें तिचा तिलाच आपल्या या अवस्थेचा नीट बोध होत नव्हता !

झिंगल्यासारखी अर्धमिटल्या डोळयांनीं ती चाचपडत आपल्या खोलीकडे गेली. दाराची दाडी हाताला सापडतांच तिला जरा धीर आला आणि आतां आपण पडत नाहीं अशी तिला खात्री आली. तिनें हळूच दार उघडलें पण लागलीच विस्मयचकित होऊन ती दोन पावलें मागे हटली.

काळोखांत तिच्या पाठीला कशाचा तरी स्पर्श घडत होता. थरकांप होऊन तिच्या अंगावर कांटा उभा राहिला. मदतीसाठी ती ओरडणार होती इतक्यांत.

'आई, तूंच का ?' असे स्वप्नाळू आवाजांतले शब्द तिच्या कानीं पडले.

'अरे देवा! करतोयस् तरी काय तूं तिकडे ?' --घाईघाईनें सोन्या-जवळ जात ती उद्गारली. जागा झालेला एडगर तिथेच पडून राहिला होता त्याला ताप तर आला नसेल अशी पहिल्याप्रथम तिला शंका आली पण इतक्यात अर्धवट झोपेत आणि रुसव्या स्वरात तो म्हणाला,

—केवढा वेळ मी तुझी वाट पहात होतो ! त्यातच मला झोप लागली.

—कां पाहिलीस पण माझी वाट ?

—हत्तीची गोष्ट ऐकण्यासाठीं.

—कोणते हत्ती ?

आतां कुठें तिला आठवण झाली कीं आपण मुलाला त्याच रात्रीं बॅरनच्या शिकारीच्या आणि अन्य साहसांच्या गोष्टी सांगण्याचें कबूल केलें होतें. त्यासाठींच एडगर तिची वाट पहात बसला होता आणि बसल्या ठिकाणीं झोंपीं गेला होता.

मुलाचें हें विचित्र वर्तन तिला बेअदबीचें वाटलें. किंबहुना, स्वतःच्या गुन्ह्याच्या जाणिवेने शरमिंदी झाल्यामुळें ती स्वतःवरच चिडली होती. आपल्या या वृत्तीचें शमन करण्यासाठीं, शेवटीं ती म्हणाली.

—फाजील कुठला, जा. झोंप जाऊन आपल्या अंथरुणावर.

एडगर आश्चर्यचकित होऊन गेला.

कोणतीच वाईट गोष्ट केली नसतांना आईनं असं कां रागवावं आपल्यावर? पण मुलाच्या या विस्मयाने तिचा मनस्ताप जास्तच वाढला:

--चालता हो आपल्या खोलींत!—भडकून जाऊन ती ओरडली. अर्थात् हा भडका स्वतःच्या अन्यायाच्या जाणिवेमुळें आलेला होता.

चकार शब्द न काढतां एडगर तेथून निघून गेला. खरोखरच तो अगदीं गळून गेला होता. पण झोपेच्या जड धुक्याखालीं पुसटपणें का होईना त्याला एवढें जाणवत होतें कीं आईने दिलेला शब्द पाळला नाहीं आणि आपल्याशीं फार वाईट वर्तन केले.

पण तो संतापला नाहीं. गळून गेल्यामुळें त्याच्या सगळ्या संवेदनांना शैथिल्य आलें होतें. आणि शिवाय, जागत तिची वाट पहाण्याऐवजीं तिच्या खोलींत झोंपीं गेल्याबद्दल तो स्वतःवरच वैतागला होता.

कालपासून तो आपल्या बाल्यावस्थेचा द्वेष करूं लागला होता. त्यांत ही आतां भर पडली. पुन्हां झोपीं जाण्यापूर्वी स्वतःवर चिडून जाऊन तो म्हणाला : "अजूनहि मूलच दिसतों मी!"

*　　　　　*　　　　　*

बॅरनला नीट झोंप लागली नाहीं. खंडित झालेल्या साहसानंतर झोपीं जाणें नेहमींच उपद्रवकारक असतें. क्षोभक आणि त्रासक स्वप्नांनीं सगळीं रात्र मनःकलहांत गेल्यामुळें कालची संधि वायां जाऊं दिल्याबद्दल तो पस्तावून गेला होता.

सकाळीं किंचित् झोंपाळू आणि अप्रसन्न अशा वृत्तीनें बॅरननें जेव्हां दिवाणखान्यांत प्रवेश केला तेव्हां एडगर एका कोंपऱ्यांतून धांवतच त्याच्या-कडे आला आणि उत्साहानें आलिंगन देऊन त्याला हजार प्रश्न विचारूं लागला.

आपला मित्रश्रेष्ठ पुन्हां एकदां सर्वस्वी आपला झाला, मग आईची नड नाहीं या विचारानें क्षणभर त्याला समाधान झालें. त्याच्या अद्भूत साहसकथा आपल्याला सांगण्याचें कबूल करूनहि काल आईनें त्या आप-णाला सांगितल्या नाहींत तेव्हां यापुढें त्या तिला सांगूं नका आपणालाच सांगा असें त्यानें त्याला सांगितलें.

उजाडल्यापासून एडगर त्याची वाट पहात होता आणि आतां त्याची एकान्तांत गाठ पडल्यामुळें उल्हसित होऊन त्यानें त्याच्यावर प्रश्नांची एकच झोड उठवून दिली होती. मधून मधून तो अंतःकरणांतील स्नेहाच्या उमाळ्याना वाट मोकळी करून देत होता. रात्रीं नीट झोंप न मिळाल्यामुळें बॅरन आधींच चिडल्यासारखा झाला होता पण किती तरी वेळ

मोठ्या कष्टानें तो आपल्या या वृत्तीवर पांघरूण घालीत होता. पण आतां हा सारा प्रकार त्याला दुःसह होत चालला होता.

त्रासून तो त्याला उत्तरें देऊं लागला होता. या नियमित अयाचित स्नेहाचा त्याला कंटाळा येऊं लागला होता. बारा वर्षांच्या पोराबरोबर रोज रोज अर्थशून्य गोष्टी करीत रहाण्याचा त्याला कंटाळा आला होता. लोखंड तापलें आहे तसे तें ठोकायला कसे मिळेल या विचारात तो गुंग होता. त्यासाठीं आईला मुलावेगळी काढणे जरूर होते पण मुलाच्या या अशा अष्टौप्रहरच्या चिकटण्यामुळे हें अगदीं दुरापास्त होऊन गेले होतें. हा अनावर स्नेह त्याला आतां जाचक होऊं लागला होता. कारण या बालमित्राच्या तावडींतून सुटण्याची शक्यता इतक्यांत तरी त्याला दिसत नव्हती. दहा वाजता एडगरच्या आईचे व त्याचें बरोबर सहलीला जायचे ठरलें होतें. तोंपर्यंत त्याच्या वटवटीकडे विशेष लक्ष न देता वर्तमानपत्र चाळीत असतांनाच त्याला न दुखवण्यासाठीं एकाददुसऱ्या शब्दानें तो त्याची बोळवण करीत होता. शेवटीं दहा वाजायला झाले तेव्हा एकाएकीं कांहींतरी आठवल्यासारखे करून शेजारच्या हॉटलात आपले चुलतबंधु काउन्ट रंडी आले आहेत की काय याची जरा चौकशी करून यायला सांगितले.

आपल्या मित्राच्या उपयोगी पडण्याची एकदाची आपल्याला संधि मिळाली या गोष्टीनें आनंदित होऊन आणि निरोप आणण्याच्या या कामगिरीचा अभिमान वाटून तो भोळाभाबडा पोरगा इतक्या लवकर पळत गेला कीं वाटेनें जाणायेणारे लोक आश्चर्यानें त्याच्याकडे पहातच राहिले.

अंगावरचें काम तत्परतेने पार पाडण्यात त्याला मोठ्या मानाचे वाटत असे. हॉटेलात गेल्यावर त्याला कळले कीं काऊंट अजून पोचलेले नाहींत किंवा त्यांच्याकडून तसा कांहीं निरोपहि आलेला नाहीं. तशीच

दुसरी धांव घेऊन मुलगा दिवाणखान्यात हजर झाला पण बॅरन कांहीं कुठेंच तिथें दिसेना. सगळया दिवाणखान्यांतून त्यानें त्याला धुंडाळलें पण व्यर्थ. अस्वस्थ होऊन तो आईच्या खोलीकडे गेला. तीहि कुठं सांपडेना. वैतागून शेवटीं त्यानें दरवानाला विचारलें तेव्हां ती दोघें बरोबरच बाहेर पडल्याचें त्यानें त्याला सांगितलें. त्याची ही माहिती ऐकून तो अगदीं कोड्यांत पडला.

तरीहि शांतपणे काहीं वेळ त्याने वाट पाहिली. त्याच्या स्वभावांतील सरलतेमुळें कोणतीच दूषित कल्पना त्याच्या मनांत आली नाहीं.

बॅरनला निरोपाचे उत्तर कळण्याची गरज असल्यामुळें तीं फार वेळ थांबणार नाहींत याबद्दल त्याची खात्री होती.

पण तासामागून तास जाऊं लागले तसतसा तो अधिकाधिक अस्वस्थ होऊं लागला.

त्याच्या निर्व्याज जीवनांत या मोहक माणसानें प्रवेश केल्यापासून त्याचा स्वभाव चंचल आणि बुजरा झाला होता. मुलांच्या नाजुक मनावर सहृदयतेचे ठसे मऊ मेणावर उमटावे तसे अगदीं स्पष्टपणे उमटत असतात. आतां त्याची डोळ्याची जुनी विकृति जागी झाली होती. यांत्रिकपणें त्याच्या पापण्या पिटपिटत रहात होत्या आणि मुद्रा जास्त जास्त निस्तेज होत चालली होती.

सुरवातीला त्याने शांतपणें त्याची वाट पाहिली, नंतर तो अत्यंत अस्वस्थ झाला आणि शेवटीं अगदीं रडकुंडीला आला. तरीहि त्याला कसलाच अविश्वास वाटला नाहीं. त्यानें आपल्या या जिवलग मित्राच्या ठिकाणीं अगदीं डोळे मिटून विश्वास ठेवला होता. त्यामुळें आपण

निरोप ऐकतांना कांहीं तरी घोटाळा केला असला पाहिजे अशी त्यानें समजूत करून घेतली. या भयंकर शंकेनें त्याचें चित्त उद्विग्न झालें.

पण शेवटीं, जेव्हां आपल्याकडे मुळीं सुद्धां लक्ष न देतां, तीं बोलत बोलत परत येत असलेलीं त्यानें पाहिलीं तेव्हां त्याला मोठें नवल वाटलें. त्याच्या गैरहजेरीची त्यांना दखल सुद्धां नसावी असें दिसत होते. —एडी, वाटेंत तुझी गांठ पडेल म्हणून आम्हीं तुला हुडकायला पुढें गेलो—त्याच्यावर सोंपवलेल्या कामगिरीचें काय झालें हें न विचारतां बॅरन त्याला म्हणाला.

—तुम्हीं उगीच मला हुडकलंत; मी तडक हमरस्त्यानें गेलों. तुम्हीं कोठून गेलांत ? कावराबावरा होऊन तो म्हणाला. पण लागलीच आईनें त्याला चूप केलें.

—बरं, बरं, मुलांनीं फार बोलूं नये बघ.

एडगर संतापानें लालबुंद झाला. त्याच्या मित्रापुढें त्याला कमी लेखण्याचा हा तिचा दुसरा दुष्ट प्रयत्न होता.

—ती असें कां बरं करीत असेल ? तिन्ही त्रिकाळ आपणाला लहान मुलाप्रमाणें वागवण्यांत तिचा काय बरं हेतू असेल ? आणि तोहि मी आतां मूल राहिलों नसतांना ?

अर्थात् तिला आपल्या या नव्या मैत्रीचा हेवा वाटतो आणि तिला आपल्या या मित्राला हिरावून घ्यायचें आहे. खास, हिनेंच बॅरनला बळें बळें दुसरीकडून नेलें. हिला यापुढें आपली अशी बेपर्वा करूं द्यायची नाहीं.

त्यानें ठरवलें कीं तिच्याशीं स्पर्धा करायचीच.

आणि जेवतांना फक्त आपल्या मित्राशीं तेवढी बातचीत करायची. आईशीं एक शब्द सुद्धां बोलायचं नाहीं.

हें काम अगदीं सोपें होतें. पण जें त्याच्या स्वप्नांत सुद्धां नव्हतें तेंच अचूक घडले. त्याच्या स्पर्धेचीच काय पण त्याच्या अस्तित्वाची सुद्धां त्यांनी दखल घेतली नव्हती. वस्तुतः आदल्या दिवशीं त्याच्यामुळेंच त्याचा परिचय घडला होता पण आज त्याचे अस्तित्व त्यांच्या गावीहि नव्हते. तीं अशा रीतीने बोलत होतीं, हंसत होतीं कीं जणू कांहीं तो त्या मेजाखालींच पडला होता.

आपल्या चेहऱ्यात रक्त चढत असून आणि कंठ आवळल्यागत होऊन जीव गुदमरत आहे असें एडगरला वाटत होते. आपल्या भयंकर असाहाय्यतेची जाणीव होऊन त्याच्या अंगाचा थरकाप उडाला. आयुष्यातल्या आपल्या एकमेव मित्राला प्रत्यक्ष डोळ्यादेखत आई हिरावून घेत असतांना तोंड दाबून त्याला गप्प रहावे लागत होते आणि या निःशब्दतेशिवाय आत्मसंरक्षणाचा अन्य मार्ग त्याला उरला नव्हता. उठावे आणि एकदम मेजावर एक मूठ मारून आपलें अस्तित्व त्यांच्या ध्यानीं आणून द्यावे अशी ऊर्मि त्याच्या अंतःकरणांत उसळून आली. पण ती त्यानें आवरून धरली आणि कांटा चमचा ठेवून देऊन त्यानें जेवण घेण्याचे बंद केलें. पण हा अन्नसत्याग्रहहि बराच वेळ त्याच्या लक्षात आला नाहीं. फक्त शेवटची 'डिश' फिरवण्यांत आली तेव्हा कुठे तें त्याच्या आईच्या लक्षात आले आणि त्याला बरे वाटत नाहीं कीं काय अशी तिनें चौकशी केली. तिला केवळ आपल्या आरोग्याची काळजी आहे अन्य जीवनाची नाहीं या विचाराने त्याचे चित्त उद्विग्न झाले.

अत्यंत शुष्कपणाने त्यानें उत्तर केलें कीं जेवणाची आपणाला इच्छा नाहीं आणि तेवढ्यानें तिचे समाधान झालें. दोघापैकीं कुणीच त्याच्याकडे लक्ष देत नव्हते. त्याचा मित्र तर त्याला अगदीं विसरून गेल्या-

सारखा दिसत होता. कारण एका शब्दानेंहि त्यानें त्याला विचारलें नव्हतें. त्याचे डोळे अश्रूंनीं डबडबून आले आणि ते गालांवरून ओघळलेले दिसण्याआधीं तोंडावरून नॅपकिन फिरविण्याच्या बालिश युक्तीचा त्यानें अवलंब केला. जेवण उरकलें तेव्हां त्याला जरा बरें वाटलें.

जेवण चाललें असतांना Maria Schutz पर्यंत गाडीनें फेरफटका करून यावें असा उभयतानीं बेत केला. क्षणभरसुद्धां आई आपणाला आपल्या मित्राशीं एकान्तांत राहूं देत नाहीं असें पाहून त्यानें ओठ चावले. जेवण आटोपून तीं उठलीं त्यावेळीं आई त्याला म्हणाली :

—एडगर, आज घरीं राहून थोडा अभ्यास कर नाहींतर शाळेंत शिकलेलें सारं विसरून जाशील.

आतां त्याचा संताप अधिकच वाढला. तूं म्हणजे शाळेंत जाणारा एक लहानसा मुलगा आहेस आणि वयस्क माणसांच्या मेहरनजरेमुळें केवळ त्यांच्यांत रहाण्याची तुला सवलत आहे असें वरचेवर जाणवून आपल्या मित्रादेखत आपला पाणउतारा करण्याचा तिनें चंगच बांधला आहे अशी त्याची समजूत झाली होती.

या खेपेचा टोमणा अगदीं स्पष्ट होता; त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं फक्त पाठ तेवढी फिरवली.

—पुन्हां वाईट वाटलं वाटतं तुला!—किंचित् हंसून ती म्हणाली, नंतर बॅरनला उद्देशून ती म्हणाली,

– तासभर अभ्यास केला तर तो फार होईल का याच्या प्रकृतीला!

– उलट एक दोन तासाचा अभ्यास त्याला हितकारच होईल—ज्या बॅरनला तो मित्र मानीत होता त्याच्याच तोंडचें हें उत्तर ऐकून तो भयभीत झाला.

हें संगनमत असेल काय ? तोहि विरुद्ध जाऊन तिला मिळाला असेल काय ?

क्रोधानें त्या मुलाचे डोळे लकाकूं लागले. आपल्या दुखण्याचा अभिमान वागवीत आणि असहाय माणसाप्रमाणें पितृसत्तेचा आधार घेत त्यानें उत्तर दिलें :

– इथें बाबांनीं मला बरें होण्यासाठीं ठेवलें आहे. शिकण्यासाठीं नव्हे. त्यानें हे शब्द धमकीवजा स्वरांत उच्चारले आणि लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं त्याच्या या शब्दांनीं तीं उभयतां बेचैन झालीं असें दिसलें. टेबलावर बोटें वाजवीत एडगरच्या आईनें नजर दुसरीकडे वळवळी आणि त्यानंतर जड निःशब्दतेनें सर्व कांहीं भरून गेलें. शेवटीं हळकुंडे स्मित करीत बॅरन म्हणाला:

–एडी, तुला बरं वाटेल तसं कर. मला कांहीं परीक्षा द्यायच्या नाहींत. त्या सगळ्यांत मी केव्हांच नापास होऊन चुकलों आहें.

पण या थट्टेनें एडगर हंसला नाहीं, उलट त्यानें अशा कांहीं भेदक दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें कीं जणूं कांहीं तो त्याच्या अंतःकरणाचा ठावच घेत होता.

घडलें काय हें त्याला कळत नव्हतें. आपल्या उभयतांमध्यें कसलें तरी स्थित्यंतर घडून आलें आहे एवढें त्याला कळत होतें. पण त्याच्या कारणाचा तेवढा उलगडा होत नव्हता.

त्याच्या चिमण्या अंतःकरणांत कसली तरी गोष्ट घाईघाईनें घण घालीत होती; आणि ती गोष्ट म्हणजे पहिली वहिली कुशंका होती.

---

# जळतें रहस्य : : : : : ६

**तो** उभयतांसमोर गाडींत बसला होता आणि त्याच्या मनांत विचार येत होते. “हा असा पालट झाला का? तीं आतां माझ्याशीं पूर्वीसारखीं कां वागत नाहींत? मी आईकडे टक लावली म्हणजे ती माझी नजर कां टाळते? तो नेहमीं माझ्याशीं थट्टेनेच का बोलतो? कुणीच कालच्यासारखं बोलत नाहीं. आणि याचे चेहरे-सुद्धां कसे अगदीं निराळे दिसतात! अन् आज आईचे ओठ इतके लाल कसे दिसतात! खास तिने ते रंगवले असले पाहिजेत. हो, इतके लाल ते कधींच नव्हते! आणि रागावल्यागत याचे कपाळ असं सारखं आंठ्यानीं का भरलं आहे? मी कुणाचंच काहीं वाईट केलं नाहीं कीं कधीं त्याना लागण्यासारखं बोललो नाहीं! छेः छेः या सगळयाचं कारण काहीं मी नाही. तींच पहा ना! एकमेकाशीं पूर्वीसारखीं वागत नाहींत. तीं असं काहीं करून चुकलीं आहेत कीं तें कबूल करायला तीं धजत नाहींत! आतां तीं कालच्यासारखीं बोलत नाहीत, हंसत नाहींत. काहींतरी तीं लपवीत आहेत. त्यांच्यांत कसलं तरी रहस्य आहे कीं जे त्यांना व्यक्त करवत नाहीं. पण वाटेल तें करून मी त्याचा छडा लावीनच लावीन... हं...हं...समजलं. पुस्तकात जें वाचता येत नाहीं किंवा नाटक सिनेमांत जे बघतां येत नाहीं तसलंच काहींतरी असावं ते! तेथें स्त्री–पुरुष कसली तरी गाणीं म्हणत मिठ्या मारतात अन् मग एकमेकांना दूर लोटतात ना? तशापैकींच कांहींसं! मागं आमच्याकडे मला फ्रेंच शिकवणारी बाई बाबांशीं नीट वागली नाहीं म्हणून तिला नव्हतं का घालवून दिलं? तसाच कांहींसा असेल हा प्रकार. या सगळया गोष्टींचा परस्परसंबंध आहे, मला तेवढा

तो कळत नाहीं. पण मी तो समजून घेईनच ! एकदां हें रहस्य उमगलं म्हणजे सगळया दारांची किल्ली माझ्या हातांत आल्यासारखी होईल; नंतर मी असा मूल रहाणार नाहीं कीं वाटेल त्यानें माझ्याशीं लपवालपवी करावी ! अन् मी कधींच फसणारहि नाहीं. या भयंकर रहस्याचा उलगडा मी करीनच करीन. ”

कपाळावर आंठी चढून त्या बारा वर्षांच्या मुलाची मुद्रा वृद्धासारखी दिसत होती. सभोवतालीं निर्मळ हिरव्या रंगानें लहानमोठे डोंगर आच्छादले गेले होते आणि वसंताच्या चैतन्यपूर्ण वैभवानें दरी भरून निघाल्या होत्या. पण या अद्‌भुतवर्ण सृष्टीकडे त्याचें बिलकुल लक्ष नव्हतें तो गंभीरपणे तसल्याच विचारांत गढून गेला होता. समोर बसलेल्या आई आणि बॅरन याच्यावरून तो मुळीं सुध्दां नजर काढीत नव्हता. जणूं कांहीं ती सजीव नजर म्हणजे त्यांच्या तेजस्वी डोळ्यांआड अगदीं तळाशीं दडलेले रहस्य खेचून काढण्याचा गळच होता. विचक्षणपणाला धार आणणारीच संशयाइतकी प्रबळ गोष्ट दुसरी नसेल. मुलांच्या अपक्व मेंदूच्या साऱ्या शक्ती असल्या अंधारातल्या गोष्टीमुळें जितक्या भरास येतात तितक्या अन्य कशानेहि येत नाहींत. ज्या जगाला आपण वास्तव म्हणतों त्याच्या पासून लहान मुलाला बिलग करणारें दार तसें पाहिलें तर अगदींच लहान आणि अढ्ढ असतें आणि योगायोगाच्या एका साध्या फुंकरानें तें त्याला उघडें होते.

अकस्मात् एडगरला वाटलें की तें अज्ञात, महत्तम रहस्य कधीहि आलें नव्हतें इतके जवळ, अगदीं आपल्या हाताशीं आलें. तें त्याला उलगडत नव्हते पण अगदीं निकट आलें असें मात्र वाटत होतें. त्यामुळें तो उत्तेजित झाला आणि त्याच्या ठिकाणीं आकस्मिक आणि घोर असे

गांभीर्य निर्माण झालें; कारण आतां आपण बाल्याची सीमा गांठली अशी त्याची भावना झाली.

त्याच्या समोरच्या त्या उभय व्यक्तींना हा प्रतिकार अव्यक्तपणें जाणवत होता. पण तो त्या मुलाकडून येत आहे हें मात्र त्यांना कळत नव्हतें. तिसऱ्या माणसाच्या उपस्थितीची त्यांना अडचण वाटूं लागली होती. अन् ते टक लावून राहिलेले डोळे त्यांना अस्वस्थ करीत होते. पूर्वीप्रमाणें बोलण्याचा त्यांना आता धीर होत नव्हता कारण त्यांचें संभाषण घातकी शब्दांच्या उत्कट जिव्हाळ्यानं दाटत चाललें होतें. कधीं कधीं ते शब्द सोडलेल्या घड्यासारखें होऊन जाई. एकादेवेळीं थोडा वेळ गप्प राहून तीं अर्ध्यावर राहिलेलें संभाषण चालू करीत. पण तोंच एडगरच्या त्या उर्मट निःशब्दतेशीं त्यांना तोंड द्यावें लागे.

विशेषतः त्याच्या आईला ही निस्तब्धता असह्य होत चालली होती. सावधपणाने ती तिरप्या नजरेने त्याच्याकडे पहात होती. त्याला ओठ चावतांना पाहून ती चकित झाली कारण संतापल्यावर एडगरचा बापहि असाच ओठ चावीत असे. शृंगारिक साहसाला सुरवात होण्याच्या वेळींच नवऱ्याची अशी आठवण झाल्यामुळे तिला दंश झाला. दोन हातांच्या अतरावरून जागती पाळत ठेवणारा तो काळ्या डोळ्यांचा अन् फिक्कट मुद्रेचा मुलगा म्हणजे तिला कुणीतरी संमंध आहे—आपल्याच अंत:करणानें उभा केलेला पहारेकरी आहे—असें तिच्या मनानें घेतलें होतें. त्यांत गाडीच्या लहानशा जागेत तें तिला दुप्पट दुःसह झालें होतें.

नंतर एडगरनें कांहीं क्षण डोळे बाजूला काढले. मातापुत्रांची दृष्टादृष्ट झाली आणि दोघांच्याहि नजरा लागलीच खालीं वळल्या. कारण

आपण एकमेकांवर आतां पाळत ठेवूं लागलों आहोंत हें त्यांना कळून चुकलें होतें. आतांपर्यंत त्यांनीं डोळे मिटून परस्परांवर श्रद्धा ठेवली होती. पण आतां उभयतांमध्यें नवीनच कांहींतरी उद्भवलें होतें. क्षणांत परिस्थिति पालटली होती. पहिल्याप्रथम तीं आतां परस्परांना टेहळूं लागलीं होतीं, आपापलें भवितव्य निराळें काढूं लागलीं होतीं. दोघांच्याहि मनांत एक-मेकांबद्दल चोरटा द्वेषभाव निर्माण झाला होता. पण तो इतका ताजा होता कीं इतक्यांत त्यांना त्याची जाणीव येणें अशक्य होतें.

घोडे हॉटेलच्या फाटकाशीं थांबतांच तिघांनांहि हायसें वाटलें. ही सहल सगळ्यांनाच तापदायक झाली होती. तें कुणीच कबूल मात्र केलें नसतें.

पहिल्यानें एडगर खालीं उतरला. डोकेदुखीचें निमित्त करून त्याची आई तडक आपल्या खोलींत गेली. ती अगदीं गळून गेली होती आणि एकटेंच पडून रहावें असे तिला वाटत होतें. एडगर व बॅरन मागें राहिले. बॅरननें गाडीवानाला पैसे दिले, घड्याळांत पाहिलें आणि मुलाकडे लक्ष न देतां तो हॉलच्या दिशेने चालता झाला.

बॅरनची ती उंच अन् सौष्टवपूर्ण मूर्ति उपेक्षेनें आणि धीट झुलत्या चालीनें त्याच्याजवळून निघून गेली होती. त्याच्या या ऐटीने त्याला इतका मोह पाडला होता कीं कालपासून ती तो उचलण्याचा प्रयत्न करीत होता. एडगरला गाडीवानाजवळ तसाच तिकडे सोडून त्याची आपली जानपछान नसल्याप्रमाणें बॅरन निघून गेला होता. अर्थात् तो त्याला विसरला होता.

तो असा निघून गेलेला पाहून एडगरचा स्वतःवरचा ताबा नाहींसा झाला. कारण अजून त्याची त्याच्या ठिकाणची भक्ति नष्ट झाली नव्हती. आपण त्याला कोणत्याच प्रकारें दुखवलेलें नाहीं याबद्दल त्याचें मन

त्याला ग्वाही देत होतें. असें असतां हा गृहस्थ आपल्याशीं एकहि शब्द न बोलतां असा निघून गेलेला पाहून त्याला परमावधीचें दुःख झाले.

सहल संपेपर्यंत त्याने महाप्रयासाने सांभाळलेलें अवसान आतां पार कुठल्याकुठें नाहींसें झालें. स्वाभिमानाचा भार त्याच्या नाजुक खांद्यावरून खालीं उतरला आणि त्याच्या ठिकाणीं पूर्वींची बालवृत्ति अवतीर्ण झाली.

भीतभीत पण वेगानें तो बॅरनच्या मागोमाग गेला आणि तो आतां जिना चढणार अशा वेळीं घाबरल्यागत अगदी रडकुंडीस येऊन म्हणालाः

–मी असं काय केलं म्हणून तुम्ही मजकडे ढुंकूनहि पहात नाहीं ? तुम्हीं असे कां वागता माझ्याशीं ? आणि आई सुद्धां ? मी काहीं वाईट केलं का तुमचं कीं त्रास दिला तुम्हांला ?

बॅरन दचकला. त्या आवाजांत भ्रमोत्पादक आणि भयसूचक असें कांहीं तरी होतें. मुलाची दया येऊन तो म्हणालाः

–खूळ लागलंय तुला एडी. माझी प्रकृति आज बरी नाहीं. तूं किती चांगला मुलगा आहेस ! तेव्हां मला किती आवडतोस हें का सांगायला हवं ?

बोलतांना तो त्याचें मस्तक कुरवाळीत होता. त्या विशाल आणि स्निग्ध आर्जवी डोळ्यांना डोळा देण्याचें टाळण्यासाठीं त्यानें आपला चेहरा बाजूला वळविला होता. आपण पार पाडीत असलेलें नाटक त्याला जाचक होत चाललें होतें. त्या मुलाच्या स्नेहाचा आपण असा खेळ मांडल्याबद्दल तो शरमिंदा झाला होता. गांहिवरामुळे वरचेवर खांडित

होणाऱ्या त्या बालस्वरानें त्याचे मन अनुकंपित झाले व स्निग्धपणानें तो त्याला म्हणाला:

– एडी, जा तूं आता. रात्री आपण गट्टी करू. बघ तरी.

– पण आई मला लवकर झोपीं जायला लावणार नाहीं अशी खबरदारी घ्याल ना तुम्ही ?

– हं. घेईन. पण बघ, मला जेवायला जाण्यासाठीं आता कपडे करायचे आहेत.

एडगर गेला. त्या क्षणीं त्याचे समाधान झालें होते. पण ाशाने त्याच्या काळजातला हातोडा काम करूं लागला. कालपासून त्याच्या वयात विलक्षण वाढ झाली होती आणि त्याच्या बालहृदयात अविश्वासरूपी अपरिचित पाहुण्यानें घर केलें होतें.

त्याने वाट पहाण्याचे ठरविले, पण निर्णायक पुरावा मिळायला फारसा विलंब लागला नाहीं. नऊ वाजेपर्यंत तीं टेबलाशींच होतीं पण आईनें त्याला झोंपायला जायला फर्मावले नाहीं. या गोष्टीमुळे तो अस्वस्थ झाला. हं फक्त आजच तिने आपल्याला जास्त वेळ कां राहूं दिलें ! झालेल्या संभाषणाविषयीं बॅरन तिच्याशीं बोलला असेल काय ?

त्याचा अविश्वास बळावला आणि सकाळीं आपण त्याच्यामागून धावल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. अगदीं दहाच्या ठोक्यावर त्याची आई उठली आणि तिने निरोपादाखल आपला हात बॅरनच्या पुढे केला. आणि उल्लेखनीय गोष्ट ही कीं या आकस्मिक निगमनाचें त्याला आश्चर्य वाटल्याचें दिसलें नाहीं किंवा आपल्या नित्याच्या सवयीप्रमाणे त्यानें तिला थांबण्याबद्दल आग्रहहि पण केला नाहीं. त्याच्या अंतःकरणांतला हातोडा अधिकाधिक वेगाने ठणकूं लागला. आतां त्याला प्रत्यक्ष पुरावा

सापडला होता. पण हें त्यानें दिसूं दिले नाहीं. चकार शब्द न बोलतां तो तिच्या मागून चालूं लागला. दाराशीं पोंचताच त्यानें वर पाहिलें. आपल्या मस्तकावरून एक सस्मित कटाक्ष बॅरनकडे फेकला गेल्याचें पाहून तो विस्मय चकित झाला. त्या कटाक्षांत कसले तरी रहस्य दडलें आहे हें त्याच्या लक्षात आलें. त्याच्या मित्रानें त्याला फसविले होतें. त्याचा अविश्वास नष्ट व्हावा आणि इतउत्तर आपल्याला अडथळा होऊं नये म्हणून त्यानीं इतक्या लवकर परस्पराचा निरोप घेतला होता तर!

–बदमाष!– तो पुटपुटला.

–काय म्हणालास?– त्याच्या आईने विचारले.

–काहीं नाहीं. – दातातल्या दातांत तो म्हणाला. कारण आतां त्याचेंहि एक गुपित होतें आणि तें म्हणजे त्या उभयताबद्दलचा द्वेषभाव, अगदीं अमर्याद द्वेषभाव.

---

# निस्तब्धता : : : : : : ७

एडगरची अस्वस्थता मावळली होती.

त्याला आपल्या भावनेची आता स्पष्ट कल्पना आली होती; ती द्वेषाची, उघड उघड शत्रुत्वाची होती.

आपल्या उपस्थितीची त्याना आडकाठी होते हें कळून चुकल्या-पासून बळेंच त्याच्याबरोबर रहाण्यात त्याला एक प्रकारचा निर्दय आणि सूक्ष्म आनंद वाटूं लागला. त्याना भडावून सोडण्यात, अतःकरणात

सांचलेल्या वैराचा सारा आवेग त्यांच्यावर ओतीत रहाण्यांत त्याला सुख होऊं लागलें. या गोष्टीचा पहिल्या प्रथम सुगावा लागला तो बॅरनला.

त्या दिवशीं सकाळीं एडगरजवळून जातांना त्याने व्हरांड्यांतच 'गुडमॉर्निंग, एडी'! असें हार्दिक अभिवादन बहाल केलें पण डोळयाची पापणीहि न उचलता एडगरनें स्नेहशून्य आवाजांत उत्तर दिलें 'गुडमॉर्निंग;' आणि जेव्हां बॅरनने 'आई खालीं आली का?' असा त्याला प्रश्न केला तेव्हां तुटकपणानें 'मला माहीत नाहीं' एवढेंच त्याने उत्तर दिलें.

बॅरन अगदीं विस्मयचकित होऊन गेला. तो मनात म्हणाला 'काय असावा याचा अर्थ?'

'एडी, रात्रीं नीट झोंपला नाहींस का?'

नेहमीप्रमाणे विनोदाकडे वळण्याचें त्याच्या मनांत होते. पण एडगरनें बेपर्वाईच्या दृष्टीने आणि आडमुठ्या नकारानें त्याची संभावना केली आणि तो पुन्हां वर्तमानपत्र वाचण्यांत गढून गेला.

'खुळचट!' असें पुटपुटत बॅरन बाजूला झाला. त्याच्यामधल्या वैराची ही उघडउघड सलामी होती. आईकडची त्याची वागणूक स्नेहशून्य पण शालीन होती त्याला टेनिसग्राउंडवर पाठवायचा तिचा अकुशल प्रयत्न नुकताच त्यानें उडवून लावला होता. विषादाने झांकलेल्या आपल्या त्रुटित स्मितांतून त्याने दर्शवून दिले कीं यापुढे आपण फसवून घ्यायला तयार नाहीं.

"आई, तुमच्याबरोबर फिरायला येणंच मला अधिक आवडेल!" खोट्या प्रेमळपणाने तिच्याकडे पहात तो म्हणाला. हें उत्तर तिला आवडलें नव्हतें हें उघड होतें. ती घुटमळली आणि कांहीं तरी शोधल्यासारखें करूं लागली.

" तर मग मी येईपर्यंत थांब ! " ती शेवटीं म्हणाली.

एडगर तिची वाट पहात राहिला खरा पण त्याच्यांतल्या अविश्वासानें साऱ्या हालचालींची डोळ्यांत तेल घालून टेहळणी चालविली होती. बॅरनच्या शब्दांत वैर आणि कपट दडलेली आहेत असें त्याच्या अशांत मनाला वाटूं लागले होतें.

अविश्वासामुळें त्याच्या स्मरणशक्तीला कमालीचा डोळसपणा आला होता. व्हरांड्यांत थांबण्याबद्दल त्याला बजावण्यांत आलें असताना तो बाहेर रस्त्यावर गेला आणि मुख्य दरवाज्याबरोबर इतरहि वाटा दृष्टीला पडतील अशा जागीं जाऊन उभा राहिला. अंतर्यामीं, अगदीं हलक्या आवाजांत कुणीतरी त्याला सागत होतें, ' तीं तुला गुंगारा देणार आहेत; ' पण अशी सहजासहजीं आज तीं निसटूं शकत नाहींत हेंही तो पुरेपूर जाणून होता. गोष्टींच्या पुस्तकात वाचलेल्या रानटी लोकाच्या प्रमाणे दडून रहावें या विचारानें जवळच जळणाच्या राशीआड तो दिसेनासा झाला.

अर्ध्या तासानें बाजूच्या दारांतून आई खरोखरच येत असलेली त्याला दिसली. तिच्या हातात गुलाबाचा गुच्छ होता आणि ती त्या बदमाषाबरोबर चालली होती. त्याला फार आनंद झाला.

तीं फार आनंदात दिसत होतीं; या पीडेचा ससेमिरा चुकला, आता एकान्तांत आपलें रहस्य बोलायला मिळेल या विचारानें त्याना हायसें झाले होतें. तीं हंसत मुखानें एकमेकांशीं बोलत होतीं आणि आतां रानाच्या वाटेनें वळणार होतीं.

तोंच योगायोगानें तेथें पोंचल्याचा देखावा करीत तो साळसूदपणे लपल्या ठिकाणाहून बाहेर आला आणि मुद्रेवर शांतता धारण करून

त्यांच्याजवळ जाऊं लागला. आपली छद्म नजर मात्र त्यानें जरा सुद्धां त्यांच्यावरून चळूं दिली नाहीं. तो दिसताच तीं गोंधळलीं आणि विचित्र दृष्टीने त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें.

‘ वा ! एडी, इथं होतास वाटतं ? आंत तुला शोधशोधून दमलों आम्हीं, ’ शेवटीं त्याची आई म्हणाली.

‘ कसं धडधडीत खोटं बोलते पण ! ’ तो मनांत म्हणाला. पण त्यानें आपले ओठ जरा सुध्दा हलूं दिले नाहींत. त्यानीं त्याच्या द्वेषाचें रहस्य व्यवस्थितपणें कडीकुलपांत बंदिस्त करून ठेवलें होतें.

तिघांपैकीं कुणालाच काय करावें हें समजेना; जो तो दुसरा काय करतो याची जणूं वाट पहात होता. शेवटीं, हातांतील सुंदर गुलाबाच्या पाकळ्या तोडीत वैतागानंतरच्या शरणागतीनें ती म्हणाली चला–

त्याच्या नाकपुड्या थरथर कांपूं लागल्या. खिळल्यासारखा तो उभा होता. तीं चालूं लागलीं कीं त्यांच्या मागून जायचं या विचाराने थांबला होता तो. बॅरननें अजून आणखी एक प्रयत्न करून पाहिला.

–टेनिसचे सामने चालले आहेत आज. त्यांतला पाहिलास का एकादा ?

एडगरनें एक उपेक्षेचा कटाक्ष तेवढा त्याच्यावर टाकला आणि शीळ घालावयाची आहे असे भासवीत् ओठ आवळून धरले. त्याचा द्वेष आतां अधिकाधिक स्पष्ट होऊं लागला होता.

त्याची ही उपद्रवकारक उपस्थिति त्यांना शल्यवत् झाली होती; संगिनींच्या जरबेखालीं चालणाऱ्या कैद्याप्रमाणें तीं त्याच्यापुढून चालत होतीं. वस्तुत: तो मुळींच बोलत नव्हता, पण संतापाच्या आसवांनीं ओलावलेल्या त्याच्या त्या कटाक्षांतून न्यायाधिशाचा करडेपणा व्यक्त होत होता;

आपुलकी निर्माण करण्याचा त्यांचा प्रत्येक प्रयत्न तो त्वेषानें धुडकावून लावी. त्यामुळें तर तो त्यांना जास्तच दुःसह होत चालला होता.

मुलाच्या या जागत्या पहाऱ्यामुळे ती अगदीं अस्वस्थ होऊन गेली होती. अकस्मात चिडीला जाऊन ती म्हणाली :

—पुढें हो की चार पावलं! पायांत घोटाळून मला त्रास देऊं नकोस असा. तिच्या आज्ञेप्रमाणें एडगर पुढे झाला. पण तीं मागें रेंगाळत राहिलीं तर तो वळून त्यांच्याकडे पाही; तीं थांबलीं तर आपणहि थांबे आणि मग अशा कांहीं भीषण, राक्षसी नजरेने त्यांच्याकडे पाहूं लागे कीं त्याने फेंकलेल्या द्वेषजालांत आपण कायमचे अडकले गेलों असेंच त्याना वाटावे.

एकाद्या ॲसिडप्रमाणें त्या दुष्ट निस्तब्धतेनें त्यांची स्वाभाविकता नष्ट झाली होती. आणि विशेषतः त्याच्या त्या दृष्टीमुळे संभाषणाची गोडी लोप पावून तें ओठातल्या ओठात विरत होतें. बॅरनला तर एक शब्दहि उच्चारण्याचा धीर होत नव्हता. महत्प्रयासानें मिळवलेली ही रमणी हातची जात आहे आणि या पोराच्या धास्तीमुळें आपल्या उन्मादावर विरजण पडत आहे या जाणिवेमुळे तो आतल्या आंत नुसता जळत होता.

शाखा पल्लवांच्या घर्षणाचा ध्वनि आणि पावलांचा तोच तो आवाज ऐकत तीं तिघेंहि मुकाट्यानें चाललीं होतीं.

एडगरनें केव्हांच त्याचें संभाषण ठार केलें होतें.

त्याच्या त्यांच्यांत आतां स्पष्ट वैर सुरू झालें होतें.

त्या उभयताचा संताप आपल्यावर ओसंडत आहे असें त्या उपेक्षित मुलाला वाटत होतें आणि त्यांतच त्याला संतोष वाटत होता. मधून मधून आपली क्रुद्ध दृष्टि तो बॅरनच्या संत्रस्त मुद्रेवर लावी. दातांतल्या दातांत

तो आपल्याला कशी लाखोली पुटपुटत आहे आणि आपल्यावर तिचा लोंढा सोडायला कसा अधीर आहे हे त्याला दिसत होतें. आणि आईचा वाढता क्रोध पाहून तीं उभयतां आपल्यावर तुटून पडण्याची, आपला मानभंग करण्याची, कायमची नागी मोडण्याची संधि पहात आहेत हें ओळखून तर त्याला राक्षसी आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. पण तशी संधि तो त्याना मिळूंच देत नव्हता. द्वेष गिळून रहाण्याची संवय होत गेल्यामुळें तो तोंडावर दिसूं न देण्यात तो आता तरबेज झाला होता.

—बरं, आपण परंतू आतां—अकस्मात त्याची आई म्हणाली. आत्मसंयमन आतां तिच्या आटोक्याबाहेर गेलें होतें. कांहींतरी केल्याशिवाय तिला आतां गत्यंतर नव्हतें नाहींतर तिला किंचाळावे लागलें असतें.

—च्चू! किती छान होती ही सहल!

—एडगर शांतपणें म्हणाला.

—दोघांनाहि कळत होतें कीं तो आपली थट्टा करीत आहे पण कुणलाच काहीं बोलण्याचा धीर होत नव्हता. दोनच दिवसांत सुलतानी गाजवण्याचें आश्चर्यकारक तंत्र त्यानें हस्तगत केलें होतें. पण त्याच्या मुद्रेवर छद्मीपणाचा मागमूसहि दिसत नव्हता.

हूं कीं चू न करतां तीं आल्या वाटेनें परत फिरलीं. मायलेक खोलींत एकटीं राहिलीं तेव्हां छत्री आणि हातमोजे फेंकून देतांना तिचा संताप उतूं जात होता.

तिच्या अनावर संतापाला तोंड फुटलें पाहिजे आणि आपणालाहि आपला क्षोभ व्यक्त करायला सापडला पाहिजे हें त्याला समजत होतें. म्हणून तिला चिडवण्यासाठीं तो खोलींत तसाच उभा राहिला. मेजावर

टक् टक् बोटें वाजवीत ती पावलं टाकूं लागली; नंतर झटकन् वळली आणि म्हणाली:

—बघ तुझ्या केसाची दशा ! अगदीं घाणेरडा आहेस; या वयांत चार चौघांत असं ध्यान घेऊन जायची लाज नाहीं वाटत?

चकार शब्द न बोलता तो आपले केस नीट करण्यासाठीं निघून गेला. ही स्नेहशून्य, हटवादी निस्तब्धता आणि ओठाचा तो तिरस्कार-दर्शक कंप तिला राग आणीत होता; तिला वाटल, त्याला चांगलं चोपून काढावं. पण 'जा तुझ्या खोलींत' एवढं ओरडून ती गप्प राहिली.

मुलाची उपस्थिति सहन करणे आतां तिला अशक्य झाले होते. एडगर निघून गेला.

बॅरनने व तिने केवढी धास्ती घेतली होती त्याची ! त्याची निर्दय दृष्टि आपल्यावर पडते कीं काय याची त्यांना सारखी भीति वाटत होती. आणि त्यांच्या या अस्वस्थतेबरोबर त्याचा आनंद वाढत राहून त्याच्या उद्धट नजरेला तेज चढत होतें.

बॅरननें आपला संताप मोठ्या प्रयासानें आवरून धरला होता. योग्य संधि साधून त्याला त्याची खोड मोडावयाची होती. त्याचे तसे बेतहि चालले होते. त्याच्या आईचा समतोलपणा मात्र पुन्हापुन्हा बिघडत होता. त्यामुळे त्याच्यावर सारखं खेकसल्याशिवाय तिला बरं वाटत नव्हतं.

—कांट्याशीं खेळत काय राहिला आहेस असा? एवढा घोडा झालास तरी अजून तुला साधे शिष्टाचार कळत नाहीत. नालायक आहेस तूं मोठ्या माणसांबरोबर जेवायला बसायला !

एडगर हंसला मात्र. तो चांगले जाणून होता कीं हा आरडा-ओरडा म्हणजे उतूं जाणारी तिच्या मनातली खदखद होती आणि तिच्या लक्षात येऊं न देता आपण ती तिला ओकायला लावीत आहों याचा त्याला अभिमान वाटत होता. डॉक्टरच्या शांतपणाने त्यानें त्याचें निरीक्षण चालविले होते.

पूर्वीही तो वाईट वागला असेल पण ते तिला कंटाळा आणण्यासाठीं. पण आता द्वेष करायला शिकल्यापासून त्याला पुष्कळ गोष्टी कळूं लागल्या होत्या. त्याने तोंड अगदीं बंद ठेवले होते. एक शब्द सुद्धां बोलत नव्हता तो. त्याच्या या अबोल्याच्या भाराखालीं तिचें हृदय उसासे टाकीत होतें. तिला असह्य होत होत हे सारं. तीं टेबलावरून उठलीं तेव्हां एडगर तिच्यामागून जायच्या बेतात होता हे पाहून तो भडकली आणि देखावा दाखावायाचे विसरून मनातली मळमळ ओकून गेली. माशाच्या गाजणुकीनं रंजीस आलेल्या घोड्यासारखी मुलाच्या उपस्थितिनं ती वैतागून गेलीं होती अगदीं.

‘ तीन वर्षाच्या पोरासारखा सदान्‌कदा चिकटून का असतोस रे मला ? अष्टौप्रहर वडिल माणसाशी काय रे तुझे काम ? लक्ष्यात ठेव, मला हे चालायचं नाही. दिवसातून एकादा तास बस ना काहीतरी उद्योग करीत. वाच काहीतरी किंवा दुसरा एकादा उद्योग कर तुझ्या आवडीचा. पण मला नकोस असा उपद्रव करू. दुर्मुखलेपणाने नेहमीं नेहमीं माझ्या मागनं फिरतोस अन् जीव नकोसा करून टाकतोस मला. ’

शेवटीं खरी गोष्ट ही अशी त्यानें तिच्या तोंडावाटे बाहेर काढली. त्या दोघाना गोंधळलेलीं पाहून एडगर हंसला. मुलाचा आपणाला उपद्रव होतो अशी कबूली आपल्याकडून दिली गेली याचे तिला वाईट वाटले अन्

ती तेथून निघून जायचा विचार करूं लागली. इतक्यांत शांतपणानें एडगर म्हणालाः

' मी इथं एकटं रहावं हें पपांना पसंत नाहीं. मी नेहमी तुझ्या-जवळच राहीन असं कबूल करून घेतलं त्यांनीं माझ्याकडून ! '

पपा या शब्दावर त्यानं चांगलाच जोर दिला. त्याचा त्या उभय-तांवर विशेष परिणाम होतो हें त्यानें ओळखलं होतं. या जळत्या रहस्याशीं कुठून तरी आपल्या पित्याचा संबंध पोचत असला पाहिजे आणि त्यामुळंच त्यांच्या नांवाचा मंत्रासारखा त्यांच्यावर परिणाम होतो हें त्याच्या ध्यानांत आलं होतं. याच्या मागच्या कारणाचा जरी त्याला उमज पडला नव्हता तरी पित्याच्या नांवाच्या उल्लेखानं तीं कावरीं बावरी होतात याविषयीं त्याची खात्री झाली होती. याही खेपेला तीं काहीं बोललीं नाहींत आणि एका प्रकारें आपली शरणांगती त्यांनीं कबूल केली.

एडगरची आई अन् बॅरन् चालूं लागलीं. एडगरही त्यांच्या मागून जाऊं लागला. पण आतां त्याच्या ठिकाणीं सेवकाच्या विनम्र वृत्ती-ऐवजीं रखवालदाराची निष्ठुर आणि करारी वृत्ति आली होती. त्यांच्या हातापायांतील अदृश्य लोहदंड निनादत होते आणि ते तोडण्याची धडपड न करतां तीं ते मुकाट्यानें ओढीत नेत आहेत असं वाटत होतं. द्वेषा-मुळें त्याच्या बालभावनेला पोलादाचें पाणी चढलें होतें. त्या दोघांपेक्षां तोच अधिक बलवान ठरला होता कारण त्यांचे हात रहस्याच्या बेड्यांत गुंतले होते.

# लबाड : : : : : ८

फुकट दवडायला आतां वेळ नव्हता. बॅरनची रजा थोड्या दिवसांनीं संपत होती. आणि तेवढ्यांत काय तें साधून घ्यायला पाहिजे होतं.

एड्गरच्या चिडखोर हटवादीपणाशीं हुज्जत घालीत रहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें त्याना कळून चुकलें होतें. तेव्हां त्याच्या जुलमांतून तास दोन तास आपली सुटका करून घेण्याच्या इराद्यानें त्यांनीं त्याच्या पासून दूर पळण्याचा निंद्य मार्ग पतकरण्याचं ठरविलं.

—हीं एवढीं पत्रें पोस्टात रजिस्टर करून ये.— त्याची आई त्याला म्हणाली.

तीं दोघें व्हरांड्यात होतीं व बॅरन रस्त्यांत गाडीवानाशीं बोलत होता. एडगरनें दोन्हीं पत्रें हातीं घेतली. पण असलीं कामें आई पूर्वी नोकराकरवीं करून घेत असे हें आठवून हा एकादा डाव तर नाहीं अशी त्याला शंका आली.

या साशंकतेनंतर त्यानं विचारलं ! 'कुठं थांबतेस माझ्यासाठीं ?'

—इथं.

—खात्रीनं ?

—तुला सांगितलं ना ?

—खरं ? तर मग जाऊं नकोस. मी येईपर्यंत इथंच व्हरांड्यांत थांब.— स्वतःचें महत्व कळून चुकल्यामुळं आईशीं दमदाटीची भाषा बोलण्या

इतका तो आतां धीट झाला होता. दोन दिवसात परिस्थिति पुष्कळच पालटली होती. नतर तो निघाला. दारातच बॅरनची व त्याची गांठ पडली. वस्तुतः गेले दोन दिवस तो बॅरनशी मुळींच बोलला नव्हता; पण आज त्याला उद्देशून तो म्हणाला:

—ही पत्रे मी टपालात टाकून घेतो; आई माझी वाट पहात राह्यली आहे. कृपा करून मी परत येण्यापूर्वी निघूं नका.—

–ठीक आम्ही थाबतो तुझ्यासाठी.--बॅरननं उत्तर केलं.

एडगर पळतच पोस्टात गेला. पण तिकडे कुणीतरी गृहस्थ कारकुनाला प्रश्नावर प्रश्न करीत राहिला होता. त्यामुळ त्याला बराच वेळ ताटकळत रहाव लागलं. शेवटी एकदाचं आपलं काम आटपून तो घाईघाईनं परत फिरला आणि आई आणि बॅरन टांग्यातून निघाली आहेत अशावेळींच अचूक तिकडे पोचला. ते पाहून त्याच्या अंगाची लाही उडाली. थोडं चुकल, नाहींतर त्यानं दगड सुद्धा मारले असते त्याच्यावर. पुन्हां एकदा हलकट लबाडीचा अवलंब करून तीं त्याच्यापासून निसटलीं होती ! काल संध्याकाळपासून आपली आई खोटं बोलूं लागली आहे याविषयीं त्याची खात्री झाली होती. आता असा वचनभंग करण्यापर्यंत तिची मजल गेलेली पाहून त्याचा तिच्यावरला उरलासुरला विश्वासहि पूर्णपणे नष्ट झाला.

वरपांगी सत्यांच्या आड एवढी घाण दडलेली आहे हें कळल्यापासून जीवनाचा त्याला उमज पडेनासा झाला होता. त्याच्या दृष्टीने जीवन हे एक अगम्य कोडे झाले होतें. वचने आणि शब्द ! साबणाच्या फुग्यापेक्षां, अधिक किंमत राहिली नव्हती त्याना. लहानशा धक्यानं केव्हाच नष्ट झाले होते ते ! या दोन प्रौढ माणसाना आपल्यासारख्या एका मुलाला

फसवायला भाग पाडणारं, गुन्हेगाराप्रमाणं पळायला लावणारं हें रहस्य मोठं भयंकर असलं पाहिजे असे त्याला वाटलं. पण ते काय असावं याची त्याला कल्पना करता येईना.

सत्ता, संपत्ति, राज्य इत्यादिकांच्या लोभानं कपटाचा आश्रय करणाऱ्या लोकांच्या गोष्टी पुस्तकातून त्यानं वाचल्या होत्या. पण हीं कशाच्या मागं आहेत ? आपणाला चक्रव्यूहाचा चंग त्यानीं कां बांधावा ? या सगळ्या असत्याच्या राशीखालीं त्याना लपवायचं आहे तरी काय ? त्यान खूप डोकं चालवून पाहिलं. पण त्याला काहींच उत्तर मिळेना. तरी पण त्याला पुसटपणं एवढं वाटलं कीं जर या कोड्याचं उत्तर आपणाला सापडलं तर बालजगाच्या दरवाज्याची कळ आपल्या हातीं लागेल आणि प्रौढ माणसाच्या जगात आपणाला जाता येईल. त्याच्या वर्तनानं त्याच्या जिवाची अशी लाही उडून गेली होती कीं सुस्पष्टपणे विचार करणं त्याला अशक्य झालं होतं नाही तर...

तो धावतच रानात गेला. त्या घनदाट निस्तब्ध अरण्यात आपल्या साऱ्या शंकाकुशंकाच निरसन होईल असे त्याला वाटले. त्यानं त्याच्या शीतल छायेचा आश्रय घेतला आणि आपल्या दुःखाला आणि एवढा वेळ आवरून धरलेल्या अश्रूंना वाट मोकळी करून दिली.

' लबाड, हलकट, हरामखोर ! '

असं ओरडून घेतलं नाहीं तर आपण गुदमरून मरूं असं त्याला वाटलं. त्याचा तो सारा संताप, ती अधीरता, ती जिज्ञासा, ती असहाय्यता, गेल्या काही दिवसांत प्रत्ययास आलेला तो विश्वासघात, सारं काही त्याच्या बालिश संयमाचे बांध फोडून डोळ्यावाटे धांवत होतं. पण या अनिर्बंध रुदनाच्या आवेगामुळं त्याच्या बाल्यावर कायमचा पडदा पडला होता.

या अश्रूंच्या दुर्दम्य पुरांत, पूर्वीचें तें प्रेम, ती श्रद्धा, तो विश्वास, तो आदर, तीं सारीं जीवनसत्वें पार कुठल्याकुठं वाहून गेलीं होतीं.

थोड्या वेळानं तो पुन्हां हॉटेलांत गेला. पण आतां तो साफ बदलून गेला होता. आतां त्याची वृत्ति अधिक धिमी, अधिक विचारी झाली होती. तो प्रथम आपल्या खोलींत गेला आणि आपल्या मुद्रेवर अश्रूंचं पुसट चिन्ह सुद्धां दिसूं नये म्हणून त्यानं डोळे व गाल नीट धुवून घेतले. मग आपल्या शत्रुद्वयाशीं दोन हात करण्याची त्यानं सिद्धता केली. ही व्यवस्था नीट मनासारखी झाल्यावर तो शांतपणे त्याची वाट पहात राहिला.

ते उभय गुन्हेगार गाडींतून उतरले त्यावेळीं मुख्य दिवाणखान्यांत बरीच गर्दी झाली होती. दोन सद्‌गृहस्थ बुद्धिबळे खेळत बसले होते. कांहीं स्त्रिया गप्पा गोष्टींत रंगल्या होत्या आणि कित्येक लोक वृत्तपत्रें व नियत॰ कालिकें वाचीत होते. एडगर या प्रौढ मंडळींत सावचित होऊन एका आराम खुर्चीत बसला होता. त्याची मुद्रा किंचित् निस्तेज दिसत होती. त्याच्यावरच सकृद्दर्शनी नजर पडल्यामुळें त्याची आई अन् बॅरन थोडींफार चिडल्यासारखीं झालीं. बनवून आणलेल्या एकाद्या समर्थनानं तीं त्याची बोळवण करणार इतक्यांत तो बॅरनच्या पुढें उभा राहिला आणि गंभीर अन् आव्हान देण्याच्या स्वरात त्याला म्हणाला :

'बॅरन साहेब, मला तुमच्याशीं थोडं बोलायचं आहे.' बॅरन्चा चेहरा गोरागोरा झाला. त्याला सांपळ्यांत सांपडल्यासारखं झालं.

'हं. हं. बोलूं अमळशानं' चाचरत चांचरत तो म्हणाला. पण सगळ्यांना ऐकूं जाईल अशा चढ्या आवाजात त्याच्या म्हणण्याचा इन्कार करून तो म्हणाला,

'तें चालणार नाहीं. मला आताच तुमच्याशीं बोललं पाहिजे. हलकटासारखे वागलांत तुम्हीं आज. तुम्हीं माझ्याशीं धडधडीत खोटं बोललांत. मी पोस्टांतून परत येईपर्यंत आपण थावेन असं आईनं मला कबूल केलं होतं हे तुम्हाला माहीत होतं पण...'

'एडगर,' त्याची आई एकदम पुढे होऊन ओरडली.

सगळ्याच्या नजरा त्या तिघांवर लागल्या होत्या. हीच योग्य वेळ ओळखून तो पुढे म्हणाला,

'या सगळ्या लोकादेखत मी पुन्हा एकदा सांगतों. तुम्हीं दोघेंही खोटं बोललात–आणि हे कृत्य अत्यंत निंद्य, अत्यंत हलकटपणाचं आहे.

हजर असलेली मंडळी चकित होऊन एकमेकाकडे पहात सूचकपणें हंसूं लागलेली पाहून बॅरनचा मोहरा पाढरा फटक पडला. फ्रॉ ब्रुमेंटलने मुलाचा दंड पकडला आणि कोरड पडलेल्या आवाजांत ती उद्गारली,

'चल, चालूं लाग आपल्या खोलींत नाही तर या सगळ्या लोकांदेखत झोडपून काढीन तुला...'

तेवढ्यात एडगरची वृत्ति निवली होती. संतापानं आपल्यावर मात केली याचें त्याला वाईट वाटलं. बॅरनला आव्हान देताना नेहमीपेक्षां आपण अधिक शांत रहावयाचं असं त्यानं ठरवलं होतं पण प्रत्यक्षात संतापानं आपला ताबा घेतला या गोष्टीनं तो त्रासल्यासारखा झाला. आणि कसलीच घाई न दाखवतां खोलीवर जाण्यासाठीं जिन्याकडे वळला.

आपल्यावर खिळलेल्या छद्मी नजरांमुळें त्याची आई गोंधळून गेली होती. ती चांचरत म्हणाली,

' कृपा करून त्याच्या या उद्धट वर्तनाबद्दल मला क्षमा करा...मला फार दुःख होतंय् या साऱ्या प्रकारामुळं...कांहीं झालं तरी अजून मूलच आहे तो...'

इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षा शीलाबाबतच्या लोकापवादाला ती जास्त घाबरत होती. आणि स्वतःच्या नावाला तसला कोणताच कलंक लागलेला तिला नको होता. परिस्थिति मोठी नाजूक असून तिच्यांतून सहीसलामत बाहेर पडण्यासाठीं मोठ्या चातुर्यानं ती हाताळली पाहिजे हें ती चागले जाणून होती. लोकांच्या डोळ्यात धूळ फेकण्यासाठीं तडकाफडकी परत न फिरतां पत्रांची चौकशी करण्याच्या निमित्तानं ती तिथेच थोडा वेळ रेंगाळली आणि मग धिम्या पावलांनीं आपल्या खोलीवर गेली. पण तिनं पाठ वळताच कुणीतरी खुदकन् हंसल्याचं आणि कुजबुजल्याचं तिला ऐकूं गेलं. अनपेक्षितपणे ती एका गंभीर परिस्थितींत सांपडली होती हे निर्विवाद होतें. आपली बाजू लंगडी आहे हे तिला पटलें होतें आणि त्यामुळें मुलाला तोंड द्यायचा धीर तिला होत नव्हता म्हणून ती कांहीं वेळ वाटेतच रेंगाळत राहिली. कालपासून एडगरने नवे रूप धारण केले होते. आणि या त्याच्या नव्या रूपाच्या दर्शनात ती गात्रगाळित होत होती. मुलाशीं आता सौजन्यानं वागणंच जास्त शहाणपणाचं होईल असं भीतीमुळं तिला वाटूं लागलं होतं. तिला कळून चुकलं होतं कीं आपण त्याच्याशीं उघड सामना केला तर तोच आपल्याहून शिरजोर ठरेल...

तिनं हळूच दार उघडलं त्यावेळीं तो खोलींत बसलेला तिला दिसला. त्यानं डोळे वर करून तिच्याकडे पाहिलं, पण त्यांत जसं भीतीचं कोणतंच चिन्ह दिसत नव्हतं तशीच जिज्ञासाहि पण दिसत नव्हती. संपूर्ण आत्म-विश्वासानं त्याची मुद्रा उजळून निघाली होती. शक्य तितकं वात्सल्य दर्शवीत ती त्याला म्हणाली,

'एडगर, ही असली कल्पना कुठून शिरली तुझ्या डोक्यांत ? तुझ्यामुळें मला मान खालीं घालायला लावलीस. एवढ्याशा मुलानं वडील माणसांशीं इतक्या उध्दटपणानं वागायचं म्हणजे काय ? चल, बॅरन-साहेबाकडे जाऊन त्याची क्षमा माग.'

'मी नाहीं' बाहेरच्या झाडाकडे पहात बेफिकीरपणानें तो म्हणाला. या उत्तराचा तिला अचंबा वाटला तरीही ती धीर करून म्हणाली, 'एडगर, काय झालंय तुला ? तूं इतका बदलून गेला आहेस कीं मला थांगच लागेनासा झालाय तुझ्या स्वभावाचा. तुझ्या समंजस स्वभावामुळं आणि गोड वागणुकीमुळं किती सुखाचा वाटत असे तुझा सहवास ! आणि आतां एकाएकीं अंगांत सैतान संचारल्या सारखा वागतोयस तूं. बॅरननं असं काय वाईट केलं तुझं ? तुझा तर जीव जडल्यासारखा दिसत होता त्यांच्यावर अन् ते सुध्दा किती प्रेमळपणानं वागत आले आहेत तुझ्याशीं ? ...'

'तें खरं. पण तुझी ओळख करून घेण्यासाठीं होतं ते सारं.'

'वेडा कुठला ! उगीच काहींतरी समजूत होऊन राहिली आहे तुझी.' बरीच अस्वस्थ होऊन ती बोलली.

'तो लबाड आणि हलकट माणूस आहे. जें जें करतो तें दीर्घसूत्रीपणानं करतो. त्याला तुझ्याशीं ओळख करून घ्यायची होती आणि त्यासाठीं सगळ्यांत सोपा उपाय म्हणजे माझ्याशीं प्रेमळपणानं वागणं. तेंच त्यानं केलं आणि मला हातात घेण्यासाठीं त्यानं मला कुत्रा देण्याचं कबूल केलं. तुला त्यानं काय वचन दिलं आहे किंवा तो तुझ्याशीं इतक्या लाडीगोडीनं कां वागतो हें कांहीं मला माहीत नाहीं, पण ममी, तुझ्या-कडून त्याला कांहीं तरी उपटायचं आहे हे निश्चित आहे. एकंदरींत माणूस दुष्ट आहे, लबाड आहे. तोंड पाहिलं त्याचं तरी कळेल तुला तो किती

नीच आहे तें. मला अशी चीड येते त्याची, त्याच्या लबाडीची, त्याच्या हलकटपणाची, त्याच्या... '

'पण, एडगर, तूं असं बोलायचं नाहीं....' विरोध दर्शवीत ती म्हणाली पण मुलाचं म्हणणं खरं आहे अशी साक्षच तिचं अंतःकरण तिला देत होतं.

'तो माणूस बदमाष आहे याबद्दल पूर्ण खात्री आहे माझी. आणि तूं कितीही सांगीतलंस तरी माझं हें मत बदलायचं नाहीं. तुझं तुलाच नाहीं का हे दिसत? तो मला घाबरतो. कां? तो आपले खरे हेतू माझ्यापासून लपवूं पहातो. कां? कारण त्याला चागलं ठाऊक आहे कीं मी त्याला अंतर्बाह्य ओळखून आहे. पक्का बदमाष माणूस!—'

'असं बोलणं ठीक नाहीं, खरंच, ठीक नाहीं.'

तिच्या मेंदूला एक प्रकारची मूर्च्छना आली होती. 'ठीक नाहीं' या शब्दाचा पुनरुच्चार करण्यापलीकडे अन्य कांहीच तिच्या तोंडून निघत नव्हते. भीतीनं तिच्या मनाचा ताबा घेतला पण ती बॅरनची होती कीं मुलाची होती याचा निर्णय करणे तिला कठीण गेले असतें.

आपल्या शब्दाचा तिच्यावर परिणाम झाला हें एडगरच्या ध्यानांत आलं होतं. तिला आपल्या बाजूला वळवून घ्यावें आणि अशा रीतीनें त्याच्याविषयींच्या द्वेषांत तिला सामील करून घ्यावें असा त्याला मोह झाला. तो तिच्याजवळ गेला आणि तिच्या कमरेभोंवतीं हात घालून प्रेमळपणाने तिला म्हणाला.

'मम्मी, तो किती दुष्ट आहे हे तुला दिसत नाहीं का? तुला बदलून टाकण्यात, तुला माझ्या विरुद्ध उलटवण्यांत त्याला यश आलं आहे.

तूं केवळ त्याला मिळायला हवी आहेस. माझी खात्री आहे कीं त्याला तुला फसवायचं आहे. त्यानं तुला काय कबूल केल असेल तें असो पण खास तो तें पाळणार नाही एवढं मी तुला नक्की सांगतों. त्याच्यावर विश्वास ठेवू नकोस. त्यानं मला फसवलं आहे. तुलाही तो फसवील. तो दुर्जन आहे आणि कुणीच त्याच्यावर विश्वास ठेवता कामा नये.'

शेवटच्या शब्दाबरोबर त्याचा गळा दाटून आला. ते शब्द आपल्याच काळजांतून उमटत आहेत असं तिला वाटत होतं; पण मुलाच्या म्हणण्यातील खरेपणा कबूल करण्याची तिला लाज वाटली. आपला आब राखण्यासाठीं प्रौढ माणसाच्या नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें, तिन चढ्या स्वराचा अवलंब केला.

'मुलांना कांहीं सुद्धां कळत नाहीं असल्या गोष्टींत; ज्या विषयात तुला काहीं कर्तव्य नाहीं तेथें उगीच तोंड घालूं नकोस. वागतांना तेवढा सभ्यतेनं वागत जा. यापेक्षां अधिक काहीं करण्याचं तुला कारण नाहीं.'

'तुला योग्य वाटेल तसं कर. आतां मात्र तुला म्हणतां यायचं नाहीं कीं मी वेळींच तुला सूचना दिली नाहीं.' शुष्कपणानें तो म्हणाला.

'तर मग तूं क्षमा मागायला कबूल नाहींस, असंच ना ?'

'हो. निश्चित तसंच.'

तीं समोरा समोर उभीं होतीं आणि यापुढं आपला त्याच्यावर अधिकार चालण्या सारखा नाहीं हें त्या स्त्रीला कळूं लागलें होतें.

'जशी तुझी मर्जी. तुझें जेवण तुला इकडेच येईल. आणि एकट्यानंच तुला ते घ्यावे लागेल. जोपर्यंत तूं योग्य तऱ्हेनं क्षमा मागत नाहींस तोपर्यंत तुला आमच्याबरोबर जेवायला मिळायचं नाहीं. तुला शिष्टाचार

शिकवलेच पाहिजेत. माझी परवानगी मिळाल्या शिवाय खोलीबाहेर पडायचं नाहीं. समजलं ?'

एडगर हंसला. हे उपहासपूर्ण स्मित आतां त्याच्या स्वभावाचा भाग होऊन राहिलें होतें. बॅरन इतकीच धडधडीत खोटं बोलणाऱ्या हिला धोक्याचा इशारा देण्याचा आपण जो हा गाढवपणा केला त्याच्या-बद्दल त्याला स्वतःचाच राग आला.

त्याच्याकडे ढुंकूनहि न बघता दार ओढून घेऊन ती चालती झाली. मुलाच्या क्रुध्द डोळ्यांची तिनं दहशत घेतली होती.

तो मोठा झाला होता; फार गोष्टी कळूं लागल्या होत्या त्याला. त्याच्या रूपानं तिची सदसद्विवेकबुध्दि तिची निर्भर्त्सना करीत होती. आपल्या मुलाच्या मुखातून आपला बहिश्चर प्राण आपणाला देत असलेला इशारा ऐकणं तिला दुःसह होत होतं. वस्तुतः एडगर ही तिच्या जीवनतातली अत्यंत रमणीय चीज होती. आजवर तोच तिच्या हृदयाचें खेळणें आणि जिवाभावाचें लेणें होता. कधीं कधीं तिला त्याचा भार होई, त्रास होई हें खरें, पण तें सारें गोड करून घेतल्यामुळें त्याचा सह-वास तिला सुखकर होत असे आणि उभयतांचीं जीवनें शांतपणें, एकाच तालांत आणि एकाच दिशेनें वहात होतीं. पण आतां मुलाच्या मनाची दिशा बदलली होती आणि त्याचा तिला विरोध होत होता. त्यांच्या स्नेहाला आतां द्वेषाचें ग्रहण लागलें होतें.

शिणल्या पावलांनीं ती जिना उतरत होती पण तिथें सुद्धां आपल्या मुलाचा धोक्याचा इशारा देणारा कोमल आवाज तिला ऐकूं जात होता. अंतर्यामींचा हा आवाज शांत करणें तिला अशक्य झालें. वाटेत लागलेल्या आरशाजवळ ती थांबली आणि त्यांत तिनं आपला चेहरा पाहून घेतला.

किती तरी वेळ ती स्वतःकडे पहात होती. • खोल, खोल जाऊन आपल्या आत्म्याचं दर्शन घेत होती. कांहीं वेळानं तिला जाणीव झाली कीं आपल्या ओठांभोंवतीं स्मित खेळत आहे आणि विशिष्ट शद्व उच्चारण्यासाठीं ते हाल-चाल करीत आहेत. पण त्या परिस्थितींत तो शद्व मोठा भयंकर होता.

अजून तो आवाज तिच्या अंतःकरणांत निनादत होता; पण तिनें शंकाकुशंका झटकून टाकण्यासाठीच कीं काय खांदे उडवले, आपल्या बोलक्या प्रतिबिंबावर एक उज्वल कटाक्ष टाकला, झगा साफसूफ केला आणि टेबलावर शेवटचे नाणें झुगारणाऱ्या जुगाऱ्याच्या निश्चयी विक्षेपानें ती आपल्या नियतीची वाट चालूं लागली.

---

## चांदण्यांतल्या सावल्या : : : : ९

ट्रेमधून वेटरनें एडगरचं जेवण आणलें. जेवण चाललें असतांना त्यानें त्याला राजी राखण्याची आपल्यापरी खूप दक्षता घेतली आणि नंतर दाराची चावी वळून घेऊन तो निघून गेला. ' असह्य आहे हें ' असें मनांत म्हणत तो त्वेषानें उठून उभा राहिला. जंगली जनावरा प्रमाणें अशी आपणाला कोंडून ठेवणारी ही आपली आईच का ? तो विचार करूं लागला. पण विचार करता करतां त्याचें चित्त काळवंडून गेले.

' मला इथं असा कोंडून ठेवून तीं खालीं काय करीत असतील ? याचवेळीं तें रहस्य तिकडे उलगडत असेल आणि तें जाणवून घ्यायची संधि हा मी असा घालवून बसत आहे. अरेरे प्रौढांच्या सहवासांत त्यांच्या

त्या रहस्याचा सुगावा लागल्याक्र मोठं कठीण असतं स्वस्थ बसणं! विशेषतः रात्रीच्या वेळीं त्याचीं बोलणीं चालली असतांना अकस्मात मी तिकडे पोचलों तर ते मला बाजूला काढतात आणि खालच्या आवाजांत बोलूं लागतात. मला त्या रहस्याची चाहूल लागते पण नीट कल्पना होत नाहीं. किती प्रयत्न करून पाहिले मी त्याचा छडा लावण्यासाठीं! पपांच्या टेबलावरची व आलमारींतली कितीं पुस्तकें वाचलीं मी! पण अख्खं पुस्तक वाचल्यानंतर सुद्धा विषयाचा पत्ता लागला असेल तर शपथ! त्यात असं कांहीं तरी आहे कीं जे हाताला लागत नाहीं. आमच्या एमाला विचारला मी त्या मजकुराचा अर्थ तर ती फिदिफिदी हंसत राहिली! मुलाच्या जन्माला यायचं, जिज्ञासा ओतप्रोत भरलेली असायची, आणि प्रश्न विचारायची सोय नसायची...मोठं भयंकर आहे हें! मोठ्या माणसांच्या दृष्टीनं नेहमीं हास्यास्पद, मूर्ख ठरणं हेंच आमच्या नशिबीं! पण कांहीं झालं तरी मी याचा छडा लावीनच लावीन. तें पुरतें हाताला लागेपर्यंत स्वस्थ बसणार नाहीं मी.'

कुणाची चाहूल लागते का हें पहाण्यासाठीं त्याने कान लांब केले. पालवींतून वारा सळसळत होता. आणि त्यामुळें झाडाच्या डहाळ्या हलूं लागून त्यांच्यांतील चंदेरी आरशाचे तुकडे तुकडे पडत होते.

'कसली तरी लज्जास्पद गोष्ट करण्यासाठीं तीं निघालीं आहेत नाहीं तर अशा खुळचट लबाड्यांचा त्यानीं कशाला आश्रय केला असता! माझी ब्याद मिटल्यामुळं मनसोक्त हंसत असतील तीं. हरकत नाहीं. माझी वेळ येणार आहे म्हणावं. मी त्यांना मला कोंडूं दिलें हाच गाढवपणा झाला माझा. मी त्यांना सारखं चिकटून रहायला पाहिजे होतें आणि डोळ्यांत तेल घालून त्यांच्यावर पाळत ठेवायला पाहिजे होती. या मोठ्या माणसांना करा-

वयाच्या गोष्टी गुप्त राखण्याइतकी अक्कल खास नसते. केव्हांतरी त्याचें बेंड बाहेर येतंच. त्याना वाटतं आपण लहान ना! असतों रात्रभर झोंपून. पण झोंपेची बतावणी करून त्यांच्या हालचालींवर आम्हांला डोळा ठेवतां येतो, अक्कल असून वेडेपणा पाघरता येतो हें त्यांच्या गांवींही नसतें. दोन महिन्यांमागें आमच्या क्लारामावशीला जेव्हां मुलगा झाला तेव्हां सगळयांना हें आगाऊ माहीत झालें असताना माझ्यापुढें मात्र त्यानीं कांहींतरी नवल बर्तल्याचं नाटक केलं. पण मी डोळे मिटून सारं कांहीं ऐकत होतों हें त्याना काय माहीत! आता सुद्धा आई अन् बॅरन कोणती गोष्ट माझ्या-पासून छपवताहेत हे बाहेर काढल्याशिवाय मी रहातों की काय! हें दार जर पारदर्शक असतं तर त्यांना मुळींच पत्ता न लागतां सारं कांहीं दिसलं असतं मला!......आणि मी ही घंटा वाजविली तर! किंवा हें कप-बश्यांचें सामान पाडलं तर! कुणितरी दार उघडील अन् मला झटकतां येईल. पण नकोच ते. उगीच नोकरमाणसांना आपली ही शोभा दिसायला नको. कुणाला दिसतां कामा नये आपला हा छळ. पण उद्यां......'

कुणातरी स्त्रीचें हास्य अकस्मात त्याच्या कानावर आलें. त्याच्या आईचंच का होतें तें? असेल. आनंदी व्हायला विपुल कारणें होतीं तिला. कोपऱ्यांत फेंकून दिलेल्या मळक्या कपड्याच्या गठ्ठयाप्रमाणं आपल्या मागची ब्याद चुकवण्यासाठीं त्या एवढ्याशा असहाय्य जीवाला तिने कोंडून नव्हतं का ठेवलं? हळूंच खिडकीकडे जाऊन त्यानं बाहेर डोकावून पाहिलें. कांहीं पोरी आपल्या प्रियकरांबरोबर हिंडत होत्या—एवढंच.

त्यानं असं डोकावून पाहिलं तेव्हां खिडकी कांहीं फारशी उंच नाहीं ही गोष्ट त्याच्या ध्यानीं आली आणि आपण काय करीत आहोंत याची जाणीव होण्याआधींच त्यानें उडी टाकली व फुलांत उतरल्यासारखा तो

खालीं आला. किंचित् आवाज झाला पण तो कुणाच्या लक्षांत आला नाहीं. आता तो पूर्णपणे मोकळा होता. शत्रूंच्या मागें जाऊन हेरगिरी करायला आतां हरकत नव्हती. इतके दिवस अत्यंत निर्मल आणि निष्पाप असलेल्या त्या मुलाचा अवघ्या दोन दिवसांत हेरगिरी हा स्वभाव होऊन राहिला होता. पाऊल वाजूं न देतां त्यानें हॉटेलला वळसा घातला. आपण सापडूं या भीतीनें त्याचें काळीज धडधडत होतें. भोजनगृह इथेंच होतें. अत्यंत सावधगिरीनें त्याने तावदानावर तोंड लावलें. तें जोडपें तिथें नव्हतें. खिडकीमागून खिडकी ओलांडीत तो चालला होता. जिन्यांत किंवा आवारात आपली त्याची टक्कर व्हायची या भीतीनें तो आंत शिरला नाहीं. शोधशोधून तो निराश होण्याच्या बेतांत आला होता. पण, अकस्मात् बाजूच्या दारांतून दोन आकृती त्याला बाहेर पडतांना दिसल्या. दिसूं नये म्हणून जीव मुठींत घेऊन तो दडला. हो. त्याची आईच होती ती. अन् तीही आपल्या तिन्ही त्रिकाळच्या सहचराबरोबर ! 'अगदीं वेळेवर पोंचलों म्हणायचा' तो मनांत म्हणाला. 'काय बोलताहेत बरं ? या खत्याळ वाऱ्यानं थोडावेळ आपली वटवट बंद केली असती तर ?' त्याची आई हंसली. चांगलं त्याला ऐकूं जाईल अशी हंसली. त्यानं तिला असं हंसतांना कधींच ऐकलं नव्हतं. तें हास्य किंचित् उन्मादित, कर्णभेदक, अत्यंत विलक्षण असं होतं. या अस्वाभाविक आल्हादामुळें जरी त्याला भीति वाटली तरी तिला तात्कालिक धोका नाहीं कारण ती आनंदांत आहे असें पाहून त्याला धीर आला. तर मग त्या उभयतांनीं हातीं घेतलेली गोष्ट तशी गंभीर स्वरूपाची नाहीं म्हणायची ! मग ती छपवण्यासाठीं हा एवढा खटाटोप कां ? ज्या रहस्याचा थांग घेण्यासाठीं आपण एवढी यातायात केली तें तेवढें मोल्यवान् आणि महत्वपूर्ण नाहीं या विचारानें त्याच्या उत्सुकतेवर विरजण पडलें.

या रात्रीच्या वेळीं तीं कुठें चाललीं असतील? जोराचा वारा आकाशांतून वहात असावा. कारण ढग सैरावैरा धावून चंद्रबिंबाला ग्रासून टाकीत होते. कधीं कधीं आकाश इतकें भरून जाई कीं वाट दिसेनाशी होई आणि मग अकस्मात् उघाड होऊन सगळी सृष्टि उजळून निघून पानन् पान चांदीच्या कांतीनें झळाळूं लागे. छायाप्रकाशाची ती क्रीडा किती तरल, अद्भुत होती! कुणी तरी यक्षकन्या विवस्त्र होऊन नववस्त्र परिधान करीत आहे आणि ते सुद्धां तिच्या निर्वस्त्र लावण्याचा आपण पुरा आस्वाद घेण्या आधींच! पुन्हां एकदा चंद्र झळकूं लागला आणि दोन आकृति एडगरला दिसूं लागल्या—किंबहुना ती एकच आकृति होती असें म्हटलें तरी चाललें असतें. कारण तीं दोघें एकरूप झाल्यासारखीं रानाच्या दिशेने बिलगून बिलगून चालत होतीं. कां? कोणीकडे? वारा देवदारांमधून धुडगूस घालीत होता.

'चलायचंच यांच्यामागून' तो मनांत म्हणाला 'या घळींत माझी चाहूल मुळींच लागायची नाहीं त्यांना.'

आपल्या पावलांची व हालचालीची चाहूल लागूं न दिल्याबद्दल वाऱ्याला त्याने त्रिवार धन्यवाद दिले! झाडाझाडाचा आणि सावली-सावलीचा आश्रय घेत तो चालला होता. आपल्या शत्रूंच्या संभाषणांतील एक शब्दहि कानीं येउं न दिल्याबद्दल त्याच वाऱ्याला त्यानें त्रिवार शाप दिले. जर कां एकदां त्यांच्या संभाषणाचा विषय कळता तर हां हां म्हणतां तें रहस्य नक्की आपणाला अवगत झालें असतें असें त्याला वाटत होतें. आपल्या मागच्या हेराचा बिलकूल दादपत्ता नसल्यामुळें फ्रो ब्लुमेंताल आणि तिचा वल्लभ आपली वाट चालत होतीं. वनश्रीने पसरलेल्या विस्तीर्ण छायांच्या रुजाम्यांवरून असीम हर्षानें तीं सर्वस्व विसरून चाललीं

होतीं. चांदरातीचें तें ऐश्वर्य आणि परस्परविषयक कुतूहल यांच्या खेरीज अन्य कशाचेंहि भान त्यांना उरलें नव्हतें. आपल्या प्रत्येक पावलावर पाळत ठेवली जात आहे आणि दोन अधीर डोळे द्वेषानें आणि कुतूहलानें सारखे आपल्याला टेहळीत आहेत याची त्यांना तरी कुठून कल्पना !

अकस्मात् अर्ध्या वाटेवर तीं थाबलीं. त्याबरोबर एडगरनें स्वतःला एका झाडाआड घट्ट चिकटून घेतलें. तो भयभीत होऊन गेला. " समजा तीं परतलीं अन् आईला मी खोलींत आढळलों नाहीं. तर ? तिला मी पाळत ठेवल्याचा सुगावा लागेल. आणि सगळेंच फिसकटून हें रहस्य उलगडणें सर्वथैव अशक्य होऊन जाईल. " सुदैवानें त्याच क्षणाला ढगांची पांगापांग झाली आणि चंद्र झळकूं लागून प्रकाशानें आसमंत उजळून गेला. लहानशा घळींत जाणाऱ्या काळोख्या अन् चिंचोळया वाटेनें नेण्यासाठीं तो तिला फुस लावीत आहे हें त्यानें पाहिलें. एडगरची आई नकार देत आहे असें वाटत होतें पण बॅरन तिला आग्रह करीत होता. कां ? तिच्याकडून त्याला काय हवं ? याला करायचं आहे तरी काय ? त्याला आपण वाचलेल्या पुस्तकाची आठवण झाली. त्यांतले खुनाचे, माणसं पळवण्याचे, असंख्य गुन्ह्याचे निरनिराळे प्रसंग त्याच्या डोळयांपुढें नाचूं लागले. तिचा जीव घेण्याचा बॅरनचा विचार असेल का ? हं. म्हणूनच त्यानं तिला असं निर्जनस्थळीं आणलें; याचसाठीं— आपणाला तिला खोलींत कोंडायला लावलं. मग मदतीसाठीं आरडा-ओरडा करायचा का ? ' खून ' अशी किंकाळी फोडावी का ? त्याचे ओठ भयानें इतके आवळले गेले होते कीं त्याच्या तोंडून शब्द फुटेना. त्याची भावना इतकी तीव्र झाली होती कीं त्याला धड उभं रहातां येईना. त्याचे पाय लटलटूं लागले आणि कोलमडूं नये म्हणून त्यानें हाता.

लगतची फांदी घट्ट पकडून धरली. पण ती मोडून 'कडाड' असा आवाज झाला.

दचकून दोघांनींही वळून डोळे ताणून काळोखांत पाहिलें. श्वास कोंडून एडगर तसाच निश्चल उभा राहिला. रानावर स्मशानशांति पसरली होती. कुठं पान हलत नव्हतं कीं कुठं आवाज निघत नव्हता. अमळ-शानं ती म्हणाली, ' परत फिरू या आपण. '

किती घाबरली होती ती ! बॅरनही घाबरला होता. त्यानें तिचें म्हणणें मान्य केलें. विचारग्रस्त स्थितींत संथ पावलानीं हातांत हात गुंतवीत तीं परत फिरलीं. त्याच्या विचारमग्नतेचा फायदा घेऊन झाडांच्या दाटीवाटींतून एडगर धूम पळत सुटला आणि हॉटेल जवळ येऊन धापा टाकूं लागला. चावी फिरवून तो खोलींत शिरला आणि कपडे काढून त्यानें खाटेवर आंग टाकलें. पूर्व स्थितीवर येण्यासाठीं त्याला कांहीं वेळ स्वस्थ पडून रहावें लागलें. नंतर, त्याचें प्रत्यागमन पहाण्याच्या निश्चयानें तो उठून खिडकीशीं गेला. तीं अत्यंत सावकाश चालत असलीं पाहिजेत. कारण बऱ्याच वेळानें त्याला त्यांच्या सावल्या दिसूं लागल्या. त्या पोपटी प्रकाशांत त्यांना भुतांची कळा आली होती. खरोखरच बॅरन हा संभावित खुनी असेल का ? आणि ती सुकी काटकी आपल्या हातून मोडली गेल्यामुळें तें भयंकर कृत्य टळलें असेल का ? पुन्हां निर्मळ चांदणें पडलें. यापूर्वीं कधींच एडगरनें आपल्या आईच्या चेहऱ्यावर इतका आनंद पाहिला नव्हता. पण बॅरनचा चेहरा लांकडाच्या ठोकळ्यासारखा आणि निराश दिसत होता. एडगरला वाटलं कीं रचलेला दुष्ट डाव फुकट गेल्यामुळं बॅरनचा नूर असा उतरला असावा.

हॉटेलच्या जवळ आलीं तशी तीं विलग झालीं. 'तीं वर बघतील का ! छेः तीं मला पार विसरून गेलीं आहेत.' नंतर विजय आणि विषाद यांच्या संमिश्र अनुभूतींत तो पुटपुटला, ' पण मी तुम्हांला विसरलेलों नाहीं. तुम्हांला वाटत असेल कीं मी झोपलों आहे किंवा नाहींच आहे या जगांत. पण थांबा जरा; तुम्हीं कसे चुकलां आहांत हें मी तुम्हांला दाखवून देणार आहें. तुमचें रहस्य तुमच्या हातून हिसकून घेतल्याशिवाय मी तुमची पाठ सोडणार नाहीं. सारखा डोळ्यांत तेल घालून जागणार आहें मी ! '

दोघांनींहि आवारांत पाऊल टाकलें. पुन्हां त्यांच्या आकृति एकाकार झाल्या. नंतर आंगण चांदण्यांत बुडून गेलें आणि हळूहळू त्याला पदस्पर्श न झालेल्या हिमाच्छादित भूपृष्ठाची शोभा प्राप्त झाली.

---

## झोंबाझोंबी : : : : : : १०

एडगर खिडकीपासून दोन पावलें मागें हटला. त्याचा श्वास कोंडला होता. शरीर हादरून गेलें होतें. कधींच तो त्या रहस्याच्या इतका निकट आला नव्हता. उन्माद, साहस, खून, विश्वासघात या केवळ मुलांनीं वाचायच्या पुस्तकांतल्या स्वप्नाळू, अस्वाभाविक आणि अप्राप्य कथा असतात अशी त्याची समजूत होती. पण अकस्मात त्याला असें वाटलें कीं धोका आणि साहस यांच्या त्या भयंकर जगांत आपण ओढलों गेलों, सहभागी झालों. या अनपेक्षित प्रारंभानं एकाच वेळीं तो भयचकित आणि आनंदित झाला.

'आमच्या जीवनांत आलेल्या याभ्माणसाच्या स्वभावाची कल्पनाच होत नाहीं मला...तो खरोखरच खुनी असेल का ? तसें नसेल तर तो आईला निर्जन आणि काळोख्या ठिकाणीं कां नेऊं पहातो ?'

कांहीं तरी भयंकर कृत्य घडूं पहात आहे हें त्याला दिसत होतें पण हें दुष्कृत्य टाळण्यासाठीं काय उपाय करावे हें मात्र त्या बिचाऱ्याला कळेना. एका गोष्टीची त्याला खात्री होती. तो उद्यां बापाला पत्र किंवा तार पाठविणार होता. पण इतक्या उशिरानं तें निरर्थक नाहीं ना व्हायचं ? याच रात्रीं काय घडेल कुणीं सागावें ? त्याची आई अजून आपल्या खोलींत आली नव्हती; ती अजून त्या बदमाषाबरोबर असली पाहिजे...

त्यांच्या खोलींच्या दोन दारांच्या मधोमध एक लहानशी लॉबी होती. कॉरीडॉरमधें जें जें कांहीं चाललें असेल त्यांतील शब्दन्‌शब्द ऐकण्याच्या निश्चयानें तो तिथें दडून राहिला. सरतेशेवटीं त्याला पावलें वाजलेलीं ऐकूं आलीं. तीं काय बोलतात, काय करतात हें जाणून घेण्यासाठीं त्याचें सारें ध्यान कानाडोळ्यांत उभें राहिलें होतें.

किती संथपणें चाललीं होतीं तीं ! – जणूं काय पर्वतच चढून जाताहेत. संध्याकाळच्या सहलीनंतर थकून गेल्यामुळें आपापल्या खोलीकडे वळण्याचें कसलेंच चिन्ह त्यांच्या हालचालींतून दिसत नव्हतें. तीं पुन्हा पुन्हां थांबत आणि कुजबुजत होतीं. बुद्धीला विलक्षण वेदना होऊन एडगर नुसता कांपूं लागला. तीं काय बोलतात तें ऐकण्यासाठीं त्यानें सर्वस्वाचें मोल दिलें असतें. तरीहि आपल्या जवळ तीं आहेत हें त्याला दिसत होतें. पण अरेरे, किती सावकाश ! आतां तिची करुणा भाकणारा बॅरनचा आवाज त्याला ऐकूं आला. त्याच्या आईच्या तोंडून शब्द निघत होते 'नको, नको. आज नको.'

एडगरच्या अंगावर कांटा उठला. ती जसजशी एकेक पाऊल त्याच्या जवळ येऊं लागली, तसतशी त्याची वेदना वाढत जाऊं लागली. नंतर तो तिरस्करणीय आर्जवी आवाज त्याला पुन्हां ऐकूं आला.

' कृपा करून नाहीं म्हणूं नकोस. अशी निष्ठुर होऊं नकोस अशा या सुंदर रात्रीं... '

आणि त्याची आई स्वसंरक्षणार्थ घाबरून जाऊन म्हणाली: ' मला धीर होत नाहीं. नको. खरंच आज नको. कृपा करून मला सोडा. '

बॅरनला तिच्याकडून काय हवं आणि ती कां अशी घाबरली आहे याचें पुन्हां एडगरला आश्चर्य वाटलें. तो ज्या दाराआड लपला होता त्याच्या दुसऱ्या बाजूला ती येऊन थांबली होती आता. एकाच खोलींत असल्याप्रमाणें त्याचें सारें बोलणें त्याला स्पष्टपणें ऐकूं जात होतें.

' ये, मातिल्द, ये ना. '

त्याच्या आईनें एक सुस्कारा सोडला; तिचा प्रतिकार क्षीण होत चालला. अं ! काय, होतंय काय ? ती खोलींत न जातां पॅसेजमधें गेली. या साऱ्याचा अर्थ काय ? ती आतां बोलत कां नाहींत ? त्या बदमाषानें तिचा गळा दाबला असेल का ? भीतीनें वेडा होऊन त्यानें दार उघडलें. एवढीशी फट ! पण तिच्यांतून जें चाललें होतें तें दिसत होतें. बॅरननें तिच्या कमरेभोंवतीं हात घातला होता आणि तो तिला फूस लावीत होता. तीहि आतां पूर्वीसारखा प्रतिकार करीत नव्हती. बॅरनच्या खोलीपुढे ती थांबली.

' आतां हा दुष्कृत्याला सुरवात करणार ' तो मनांत म्हणाला. पुस्तकांतल्या भयंकर गोष्टींच्या आठवणीनें त्याच्या चित्तांत गर्दी केली होती.

तत्काळ त्यानें दार लावलें व सरळ तो त्यांच्या दिशेनें धांवला. काळोखांत आपल्या समोर येत असलेली ती आकृति पाहून ती ओरडली व दचकून बाजूला झाली. पण लगेच मूर्च्छा आल्यासारखे होऊन ती गळून पडली. बॅरननें तिला सांवरून बाहुपाशात घेतलें. त्याचवेळीं दोन चिमुकल्या मुठींचे आपल्या नाकातोंडावर प्रहार होत आहेत आणि मांजराच्या नखांचे ओरखाडे निघत आहेत असें त्याला वाटलें. भानावर येउन तिनें पोबारा केला आणि आपल्या शत्रूची नीट कल्पना न होऊन तो आंधळेपणानें मुठी चालवूं लागला.

ऐन ज्वानींत असलेल्या त्या माणसाच्या प्रतिकाराला तोंड देण्या-इतकें सामर्थ्य आपल्यांत नाहीं याची एडगरला पुरेपूर जाणीव होती. पण आपली शिकस्त करण्याचा त्याचा निर्धार होता. निदान आपल्या द्वेषाची पुरी जाणीव त्याला द्यायची असें त्यानें ठरविलें होतें. दांत ओंठ खात आणि सर्व शक्ति वेंचून तो एकसारख्या मुठी हाणीत होता. बॅरननें आतां आपल्या हेराला ओळखले होतें. त्याने त्याला चांगलाच ठोक दिला. रंगाचा बेरंग करणाऱ्या त्या पोरावर तो संतापला होता. हूं कीं चूं न करता एडगरनें तें सगळें सहन केले. कांहीं मिनिटें त्यांची ही लढत चालली होती. शेवटीं आपण एका पोराशीं भाडत आहोंत या गोष्टीची लाज वाटून बॅरननें त्याला मानगुटीला धरून एक हात लांब ठेवलें. त्याच्या शक्तीपुढें आपले कांहीं चालत नाहीं असे पाहून एडगर चवताळून उलटला आणि त्यानें त्याच्या उजव्या हाताला कडकडून चावा घेतला. बॅरन घोगऱ्या आवाजांत ओरडला, त्याची पकड ढिली पडली आणि तो भाना-वर येण्यापूर्वी एडगरनें आपली खोली गांठून तिला कडी लावली.

मध्यरात्रीच्या या झगड्याचा कुणालाहि पत्ता लागला नाहीं. सगळे लोक गाढ झोंपीं गेले होते. स्मशानांतील कबरांप्रमाणें सर्व कांहीं निश्चल,

शांत होतें. बॅरननें रुमालानें आपल्या हाताचें रक्त पुसून घेतलें. अस्वस्थ चित्तानें त्यानें कॉरिडॉर मधल्या काळोख्या जागेकडे पाहिलें. कुणीसुद्धां दिसत नव्हतें तिथं; आणि तरीहि त्याच कुठेंतरी एक दिव्याची वात भिर-भिर कांपत त्याची फजीती पाहून हंसत होती.

---

## वादळ : : : : : : ११

'तें सारं एकादं भयंकर स्वप्न तर नव्हतं!' दुसरे दिवशीं सकाळीं उठला त्यावेळीं तो स्वतःलाच म्हणाला. त्याचें डोकें दुखत होतें. आपल्या अंगावर त्याची नजर गेली तेव्हां आपण कपड्यांसह झोपीं गेल्याचे त्याला दिसून आलें. उडी मारून तो आरशाजवळ गेला. उतर-लेला निस्तेज चेहरा, विस्कटलेले केस, लाल लाल टेंगळामुळें विद्रुप दिसणारें कपाळ अशी आपली मूर्ति त्याला दिसून आली. मोठ्या कष्टानें त्यानें कल्पनांची जुळवाजुळव केली आणि काय काय घडलें याची तो आठवण करण्याचा प्रयत्न करूं लागला. मध्यरात्र उलटल्यानंतर केव्हांतरी, खरंच, त्या पॅसेजमधे आपल्या शत्रूशीं आपण दोन हात केले; नंतर आपण पळत खोलींत आलों, आपण पळून जाण्याचा विचार केला; पण श्रमानें आपण गळून गेलों होतों; कपडे काढल्या शिवाय आपण अंथरुणावर अंग टाकलें होतें; तेथेंच आपण अस्वस्थ झोपेच्या आहारीं गेलों; झोपेंत सुद्धां तसलींच स्वप्नें आपणाला पडलीं होतीं आणि आपणाला रक्ताचा वास येत होता.

इत्यादी गोष्टी त्याला आठवूं लागल्या. खालीं बागेंत कुणाचीं तरी पावलें वाजलेलीं ऐकूं येत होतीं; लोकांचे आवाज त्याच्या कानांपर्यंत येत होते. आकाशांत सूर्य बराच वर आला होता. वेळ बराच झाला असला पाहिजे. त्यानें घड्याळांत पाहिलें पण तें बंद पडलें होतें. भावनावेगांत सांपडल्यामुळें तो त्याला चावी देण्याचें विसरून गेला होता. इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां नक्की वेळ कळण्याच्या अशक्यतेमुळें तो अस्वस्थ झाला. झटपट त्यानें कपडे काढले, अंगतोंड धुवून घेतलें आणि नवे कपडे घातले. नंतर तो खालीं गेला. त्याला मन खात होतें. चित्त अस्वस्थ करीत होतें.

त्याची आई टेबलावर सकाळची न्याहारी घेत भोजनगृहांत बसली होती. सुदैवानें एकटीच होती ती तिथें. बॅरनचें ते तिरस्करणीय मुख अवलोकन करावें लागलें नाही म्हणून त्याला हायसे वाटलें...पण टेबलाशीं येऊन त्याने आईला अभिवादन केले तेव्हां एडगरला आत्मविश्वास नव्हता.

त्याला उत्तर न देतां ती खिडकीवाटे निश्चलपणें पहात राहिली. तिचा चेहरा उतरला होता, डोळयांभोंवतीं दाट काळीं वळीं पडलीं होतीं आणि तिच्या नाजुक नाकपुड्या थरथर कापत होत्या. ज्या ज्या वेळीं ती अशी भावनाविवश होई त्या त्या वेळीं त्या अशाच थरथरूं लागत. एडगरनें ओठ चावले. तिच्या स्तब्धतेनें तो कोड्यांत पडला होता. पॅसेजमधें 'ओटो' वर कुणी झडप घातली हें कळलें असेल का तिला ? बॅरनला गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या असतील का आपल्याकडून ? या शंकांनीं त्याच्यावर आक्रमण करून त्याला छळायला सुरुवात केली. त्यांत तिच्या निश्चल रिकाम्या दृष्टीमुळें तो जास्तच घाबरला होता; त्याला जागचा हलायलाही भीति वाटत होती. न जाणो अकस्मात वळून ती आपल्यावर

लागायची. तिचें लक्ष आपल्यावर जाऊं नये म्हणून मुळींच आवाज होऊं न देतां त्यानें पाव खाल्ला व कॉफी पिऊन टाकली. ती खूप रागावली असली पाहिजे हें त्यानें ओळखलें; चांगलीं पंधरा मिनिटें गेलीं. कांहीं तरी घडेल म्हणून तो वाट पहात होता. पण तिच्या तोंडून अवाक्षर निघालें नाहीं. नंतर, त्याच्या अस्तित्वाची मुळींच दखल न घेतल्यासारखें करून ती उठली व जाऊं लागली. आतां काय करावें ? तसेंच टेबलाशीं बसून रहावें कीं तिच्यामागून जावें ? शेवटीं जावेंच असें त्यानें ठरविलें. तरी तिनें त्याची उपेक्षा तशीच चालू ठेवली. तसतसा तो जास्तच दीन होत गेला. कुठें जायचें हें न कळून तो मागें राहूं लागला. नंतर तो तिच्या खोलीवर गेला पण खोलीचें दार लागलेलें होतें.

त्याचा कालचा जोमदारपणा पार नाहींसा झाला होता. काय करावें हें त्याला कळेनासें झालें होतें. आपण बॅरनवर असे तुटून पडलों हें कदाचित ठीक झालें नसावें असें त्याला वाटूं लागलें. तीं आपला वचपा काढण्याच्या विचारात असतील कीं आपली मानखंडना करण्याचा नवा उपाय योजीत असतील ? त्याला अडकून ठेवण्यासाठीं नवा सापळा रचण्यांत तीं गढलीं असावीं असें त्याला खात्रीपूर्वक वाटूं लागलें. वादळ जमूं लागलें असून ढगाढगांतून विजेचे चमकारे धांवत आहेत असें कांहीं तरी त्याला वाटत होतें. सकाळपासून त्याच्या मनावर या शंकेनें दगड ठेवल्यासारखें झालें होतें. लंचच्या वेळीं तो टेबलाशीं आला तो राईएवढा होऊन.

डोक्यावर कोसळूं पहाणाऱ्या राक्षसी मेघाप्रमाणें दिसणाऱ्या त्या निस्तब्धतेचा भंग करण्याच्या इराद्यानें त्यानें तिला म्हटलें, 'गुड डे'.

तिनें आरपार त्याला पाहिलें आणि याही खेपेला तिनें उत्तर केलें नाहीं. ती किती संतापली आहे, संतापातिरेकामुळें तिला कसें बोलवत

नाहीं हें एडगरला कळून चुकलें. इतक्या कडेलोटाला त्यानें तिला कधींच आणलें नव्हतें, बिचाऱ्याचा काळजाचा ठाव सुटला; आतां मात्र त्याला खरीखुरी भीति वाटली. ती अनेकदां त्याच्यावर रागावली असेल, पण तें केवळ वरवर, अगदीं मनापासून नव्हतें. उन्हाळ्यांत वादळ यावं, कांहीं क्षणानंतर ओसरावं अन् मग लख्ख उजेड पडावा तशासारखा असे तो राग. पण त्याची खात्री झाली कीं आज तिचा सारा गाभा हादरून गेला आहे, तिच्या स्वभावांतली कसली तरी अदम्य वृत्ति चवताळून उठली आहे. आपण चिडवून उठविलेल्या या शक्तींना तोंड देण्याची पाळी आलेली पाहून त्याच्या अंतःकरणांत कांपरें भरलें. त्याला घड घांस गिळतां येईना; त्याचा घसा कोरडा पडला होता; ओठ फुटून निघत होते. त्याच्या या दुर्दिन अवस्थेची तिला कांहींच कल्पना नसावी. शेवटीं एकदांचें जेवणाचें तें भयंकर दिव्य संपून तीं टेबला-वरून उठलीं तेव्हां फ्रो ब्लुमेंताल मुलाकडे वळून म्हणाली,

'एडगर, माझ्या खोलींत चल. मला तुझ्याशीं दोन शब्द बोला-यचे आहेत.'

देव दयेनें तिच्या आवाजांत धमकी नव्हती. पण तिच्या वाग-ण्यांत विलक्षण थंडपणा अन् तुटकपणा दिसत होता. गार पाण्याची कळशी अंगावर ओतावी तसे ते शब्द त्याला वाटले आणि त्याला हुडहुडी भरली. त्याचा उद्धटपणा लयाला गेला आणि फटका बसलेल्या कुत्र्या-प्रमाणें तो तिच्यामागून खोलींत चालता झाला.

कांहीं वेळ तशीच मुकाट राहून तिनें त्याची जास्तच गांजणूक केली. उघड्या खिडकींतून खेळणाऱ्या मुलांचे आनंदी हास्यनिनाद ऐकूं येत होते; पण एडगरचें काळीज इकडे पिळून निघत होतें. त्याच्या

आईलाहि अवघडल्यासारखें होत होते. मुलाची नजर टाळून तिनें त्याच्याशीं बोलायला सुरवात केली.

'एडगर, तुझ्या वर्तनाबद्दल मला काय वाटतं हे मला सांगायचं नाहीं. त्याच्या केवळ कल्पनेनं माझ्या अंगावर कांटा उठतो. त्याचे परिणाम तुला भोगले पाहिजेत. संमजस आणि प्रौढ लोकांत कसं वागावं हें तुला कळत नाहीं. मी तुझ्या वडलांना कळवलं आहे कीं, यापुढें माझ्याच्यानं कांहीं तुला वळण लावतां येत नाहीं, कारण तूं अधिकाधिक भडकत चालला आहेस तेव्हां तुला यापेक्षां कडक शिस्तींत ठेवले पाहिजे. मी त्यांना सुचविले आहे तुझ्यासाठीं एकादा चांगला शिक्षक पहायला किंवा तुला एखाद्या बोर्डिंग स्कूलमध्ये पाठवायला. त्याशिवाय तुला वळण लागायचं नाहीं. एवढंच. यापुढं तुझ्यामुळं मी डोकं उठवून घेणार नाहीं.'

एडगरनें मान खालीं घातली. त्याला चांगलें माहीत होतें कीं हा केवळ उपोद्घात आहे, पुढला भाग याहूनहि वाईट आहे. ती पुढें म्हणाली,

'तुला बॅरनची क्षमा मागावी लागेल...'

एडगर चमकला; पण ती इट्टाला पेटली होती. तिनें त्याला विरोध दाखवायला क्षणाचीहि सवड दिली नाहीं.

'ते सकाळींच गेले आहेत. मी सांगेन तसें त्यांना पत्र लिही...'

एडगरनें बोलण्याचा पुन्हा प्रयत्न करून पाहिला. पण त्याला बोलूं न देतां ती घाई घाईनें म्हणाली,

'एक शब्दहि ऐकून घेणार नाहीं मी! बस. तो तिकडे कागद आहे आणि तें पेन...'

एडगरने डोळे वर करून तिच्याकडे पाहिलें. तिच्या निष्ठूर डोळ्यांत निश्चय स्पष्ट दिसत होता. ती कधींच त्याला अशी दिसली नव्हती. तो टेबलाशीं गेला, त्याने पेन उचललें आणि मान खालीं घालून तो कागदाकडे पाहूं लागला.

" घाल तारीख. झालं ? सोड एक ओळ. ठीक. लिही. 'प्रिय बॅरनसाहेब,' स्वल्पविराम. आणखी एक ओळ सोड. किंचित उजव्यानें कर सुरवात. 'तुम्हीं सेमरिंग सोडलंत हें कळून मला फार वाईट वाटलें.' जोडाक्षरं नीट काढ. झालं ? लिही पुढं. 'आपला प्रत्यक्ष निरोप घेतां न आल्यामुळे हा असा पत्रद्वारें घेत आहे.' हं झटपट. कित्ता काढल्यासारखं अक्षर नको आहे. पूर्णविराम. 'रात्रींच्या माझ्या गैरवर्तनाबद्दल मी आपली क्षमा मागतो. जिवावरच्या दुखण्यातून उठल्यापासून लहान-सहान गोष्टींनीही मी कसा चिडीस जातो हें आईनें तुम्हांला सांगितलें आहेच. त्यामुळें माझ्या हातून भलत्या गोष्टी घडून जातात आणि नंतर त्याबद्दल मला खेद होतो...'

त्याची वांकलेली मान ताठ झाली; तो मागें वळला. त्याची मुद्रा निर्भयतेनें झळाळूं लागली.

'हें खरें नाहीं; मी असं लिहिणार नाहीं...'

'एडगर' आईनें त्याला दरडावलें.

'तें खरें नाहीं. मला वाईट वाटावें असें मी कांहींच केलेलें नाहीं. दुसऱ्याची क्षमा मागण्यासारखी कोणतीच द्वाड गोष्ट मी केलेली नाहीं. तूं मदत मागितलीस म्हणून मी धांवलों. एवढेंच काय तें मी केलें.'

तिनें ओठ चावला; तिच्या नाकपुड्या कांपूं लागल्या. 'मी मदत मागितली ! एडगर, वेड लागलंय तुला.'

एडगर उसळून म्हणाला,

'हो, मागितलीस, तिथं त्या पॅसेजमधें. रात्रीं त्यानें तुला घट्ट धरलें होतें तेव्हां.' 'मला जाऊं द्या, मला सोडा,' असें तूं एवढ्या मोठ्यानं म्हणालीस कीं तें मला माझ्या खोलींत स्पष्टपणें ऐकूं आलें.'

'तूं खोटं सांगतोस. मी न् बॅरन पॅसेजमधें नव्हतों. जिन्यापर्यंतच ते माझ्याबरोबर होते!'

असत्याचा हा कळस पाहून त्याच्या सहनशीलतेचा कडेलोट झाला. भ्रमिष्टासारखा तारवटलेल्या डोळ्यांनीं तिच्याकडे पहात तो चाचरला,

'तूं.. पॅसेजमध्यें ...नव्हतीस! आणि .. त्यानं ... तुला... धरलं ... नव्हतं! घट्ट ... तुझ्या इच्छेविरुद्ध!'

ती हंसली. पण तें अत्यंत निस्सत्व कोरडं हास्य होतं.

'तुला स्वप्न पडलं असलं पाहिजे खास!'

आतां हें फार झालें. प्रौढ माणसें कशीं खोटं बोलतात, कशा लबाड्या करतात, खोट्याचं खरं कसं करतात, द्व्यर्थी बोलून पळवाट कशी काढतात हें त्याच्या चांगल्या परिचयाचें होतें. पण धडधडीत डोळ्यांनीं पाहिलेल्या गोष्टी नाकारण्यापर्यंत त्याची मजल जाऊं शकते हें त्याला सहन करवेना.

'आणि माझ्या कपाळावरचें हें भलें थोरलें टेंगूळसुद्धां स्वप्नांतलेंच का?'

'मला काय माहित तूं कुणा सोबत्याशीं मारामारी केलीस तें! मला आतां तुझी वटवट नको. बस अन् लाग लिहायला.'

ती अमर्दी बांदरी फटक पडली होती आणि मोठ्या कष्टानें वृत्ति शांत राखीत होती.

पण एडगर चिडला. वडील माणसांबद्दल विश्वासाचा आणि श्रद्धेचा शेवटचा मंद निखाराही आतां त्याच्या अंतःकरणांत विझून गेला. सत्य असं पायदळीं तुडवतें तरी कसें माणसाला ? असलें धडधडीत असत्य त्याला सहन करवेना. त्यानें आपल्या सर्व शक्ती गोळा केल्या आणि तो शांत, संयत आणि कठोर बनला. त्याच्या स्वराला विलक्षण मर्मभेदकता प्राप्त झाली. "तर मग स्वप्नांतच होतों मी! पॅसेजमधला तो सारा प्रकार, कपाळावरचें हें टेंगूळ—केवळ स्वप्नच तर हें सारें! आणि तूं आणि तो चादण्यांत फिरत होता तेंही स्वप्नच! घळींतल्या चिंचोळ्या अन् अंधाऱ्या वाटेने तो तुला नेत होता तेंही खोटंच! यांतलें कांहीं सुद्धा खरं नव्हे. हो ना? मी खोलींत कोंडून राहीन असंच वाटलं असेल तुला. नाहीं का? तूं समजतेस तितका मी मूर्ख नाहीं. समजलं?"

त्यानें निर्भयपणें तिच्याकडे पाहिलें. आणि त्याच्या या विक्षेपानें ती क्षणभर नरम आली. आपल्या एकुलत्या मुलाच्या डोळ्यांतून उडणाऱ्या त्या द्वेषाच्या ठिणग्या बघत रहाणें मोठें दुःसह होतें. शेवटीं तिचा संताप अनावर झाला.

'तोंड आटप! मी सांगते तसं लिही ताबडतोब. नाहींतर...'

'नाहींतर काय?' अधिकच उद्धटपणानें त्यानें विचारलें.

'नाहींतर मुलाला बडवतात. तसं मी तुला बडवीन.'

एडगर दोन पावलें पुढें झाला आणि उपहासानें हंसूं लागला.

तिचा हात वर उचलला गेलाच होता तो ताडकन त्याच्या डोक्यावर आदळला. संतापानें आणि आश्चर्यानें त्यानें किंकाळी मारली. नंतर बुड-णाऱ्या माणसानें नाकातोंडात पाणी गेल्यावर आधार सांपडण्यासाठीं वाटेल तसे हात मारावे तसा तो आंधळेपणानें मुठी चालवूं लागला. त्याच्या मुठींना मृदुल आणि विनत असा स्पर्श घडत होता. पुन्हा त्यानें प्रहार केला. पण तो तिच्या भकास चेहऱ्यावर. इतक्यांत एक किंकाळी फुटली...

या करुण किंकाळीनें तो भानावर आला. आपण काय केलं हें ! कसली भयंकर, अक्षम्य गोष्ट झाली ही ! त्यानें प्रत्यक्ष आपल्या आईला मारलें होतें. लज्जा, भीति, किळस या भावनांनीं तो असा झपाटला गेला कीं धरणी दुभंग होऊन आपणाला पोटांत घेईल तर बरें असें त्याला वाटूं लागलें. तिच्या डोळ्यापुढून केव्हां एकदां आपण अदृश्य होतों असें त्याला झालें. दूर ... दूर ... एडगर तिथून दारात, दारांतून जिन्यांत, जिन्या-तून हॉलांत आणि हॉलमधून रानांत पार दिसेनासा झाला. दूर...दूर... पृथ्वीच्या पलीकडे ! भुंकणारे शिकारी कुत्रे मागें लागल्याप्रमाणें तो वाट फुटेल तिकडे पळत सुटला.

---

## उलगडा : : : : : : १२

शेवटीं एडगर एकदांचा थांबला. त्याचे हात पाय, त्याचें शरीर असें कांहीं कांपत होतें कीं स्वतःला सांवरण्यासाठीं त्याला झाडाचा आधार घ्यावा लागला. त्याला धाप लागली होती. आतां काय करावं ? कुठं जावं ? कांहीं काल घरासारख्या होऊन राहिलेल्या या इमारतीच्या नजीक रहाणें त्याला अशक्य झालें होतें. तो असहाय परित्यक्त होता. सारें जग निष्ठुर आणि स्नेहशून्य झालें होतें. काल सावली देणारी आणि

बंधुभावानें त्याच्या भोंवतीं गोळा होणारीं. हीं झाडें तुटकपणानें वागून त्याचा तिरस्कार करीत होतीं. त्याच्यापुढें अज्ञानाची विस्तीर्णता पसरली होती. त्या विशाल निसर्गामधला तो विजनवास त्याला भयप्रद वाटला. हा एकाकीपणा असह्य होता. कुठें तरी जाऊन कुणाचा तरी सहवास मिळवला पाहिजे असें त्याला वाटलें. विंद्दिनाला आपल्या बापाकडे जाण्याचा त्याला धीर होईना. त्याची शिस्त करडी होती. त्याने त्याला तत्काळ सिमरिंगला परत पाठविलें असतें. हा विचार त्याला असह्य झाला. त्यापेक्षां एकट्यानेच अज्ञाताचा प्रदेश तुडवीत रहावें हें बरें. त्याला वाटलं कीं इतउत्तर आपण हिला मारलें होतें याची आठवण झाल्याशिवाय आईकडे आपण पाहूं शकणार नाहीं.

आजीकडे गेलो तर! तिने नेहमींच त्याचे लाड केले होते. केवढी प्रेमळ बाई! घरीं ज्या ज्या वेळीं तो संकटात सापडे त्या त्या वेळीं ती त्याची कड घेत असे. आईवडिलाचा राग निवेपर्यंत आजीच्या घरचा आश्रय घ्यायला हरकत नव्हती. तेथून आपण आईवडिलांची क्षमा मागून भलें मोठे पत्र लिहूं. त्याचा सारा अभिमान आता उतरला होता. या जगडव्याळ आणि द्वद्वरूप विश्वपसाऱ्यात त्याचा जीव चिमणीसारखा एवढासा आणि असहाय होऊन गेला होता. काही दिवसांमागे आपण लहान होतो. तसें पुन्हा लहान होऊन जावें ह्मणून त्याचें हृदय उसासूं लागलें.

ब्रेडनला कसं जायचं? नेहमीं त्याच्या बरोबर असणाऱ्या बेंगरूळ पाकिटांतून वाढदिवसानिमित्त देण्यांत आलेले सोन्याचें नाणें त्यानें बाहेर काढलें. हातरुमालानें रोज तो तें घासून पुसून ठेवीत असे. तें लखलखीत नाणें मोडण्याचा धीर त्याला होत नव्हता. चिमण्या सूर्यासारखें तळपत होतें तें. किती मनोहर, किती चमकदार, किती सुंदर! तिकिट घ्यायला

पुरेल का तें ? कितीदां तरी त्यानें आगगाडीनें प्रवास केला होता ! पण त्यासाठीं किती पैसे लागतात याची त्यानें केव्हांच चौकशी केली नव्हती. त्याच्या एवढ्याशा आयुष्यांत वास्तवतेशीं त्याचा हा असा पहिल्यांदांच संबंध येत होता. त्यानें गृहित धरलेल्या गोष्टींना स्वतंत्र मोल आहे आणि त्या म्हटल्या बरोबर येऊन पडत नाहींत हें त्याला कळून आलें. थोड्याच वेळापूर्वीं त्याला वाटत होतें कीं आपण फार हुषार आहों आणि जाणण्या-सारखें सर्व काहीं आपणाला कळलें आहे. पण मोहरबंद पुस्तकाप्रमाणें कितीतरी प्रश्न आणि रहस्यें आपणाला अज्ञात आहेत याची त्याला जाणीव झाली. आपल्या अडचणी त्याला दिसूं लागल्या. जसजसा तो स्टेशनकडे जाऊं लागला तसतसी त्याची दीनता वाढूं लागली. त्यानें कितीदां तरी जगात जाऊन कवि, योद्धा, राजा, बादशहा इत्यादि होण्याचे मनोरथ रचिले होते. असल्या मनोरथाना सत्यसृष्टींत उतरविताना केवढे प्रयास पडतात हें अनुभवानें कळूं लागल्यापासून त्याचा जीव राई एवढा होऊन गेला होता. आणि स्टेशनची इमारत दिसूं लागल्यापासून एकाच प्रश्नानें त्याला घेरून टाकले आणि तो म्हणजे, 'आपल्याकडचे पैसे तिकिटाला पुरतील ना ?' चमचमणारे रूळ अनंतापर्यंत पसरले होते. वेटिंगरूममधें किंवा स्टेशनवर एकहि जीव दिसत नव्हता. हळूच तिकिट ऑफिसकडे जाऊन बॅडनला जायला काय पडतें याची त्यानें विनयपूर्वक चौकशी केली. बारक्या भोकातून दोन चकित डोळे त्याच्याकडे पाहून प्रेमळपणानें हंसूं लागले.

'अर्धे तिकीट कीं सगळें ?'

'सगळे.' त्याचा सारा अभिमान गळून गेला होता.

'सहा क्रावन.'

'मग कृपा करून मला एक तिकीट द्या.'

# उलगडा

आपलें लखलखणारें धन त्यानें ऑफिसच्या फटींतून आंत लोटलें आणि तिकिट व मोड काढून घेतली. तो कार्डबोर्डचा तुकडा नव्हता तर स्वातंत्र्याचा परवाना होता असें त्याला वाटलें. त्यानें चांदीची तीं नाणी खिशांत घातलीं आणि त्यांचा खुळखुळ आवाज ऐकून त्याला परम समाधान झालें.

गाडी यायला अजून वीस मिनिटें अवकाश होता. कुणाच्याहि दृष्टीला आपण पडणार नाहीं अशा बेतानें हळूच एडगर फाटकांतून आंत गेला. कांहीं प्रवासी आंत येऊन उगीच प्लॅटफॉर्मवरून इकडून तिकडे फिरत होते. त्यांचें तो बसल्या ठिकाणीं लक्ष नव्हतें पण त्याला मात्र सगळ्यांचे डोळे आपल्यावरच खिळले आहेत असे वाटत होतें. लांबून गाडीनें शिटी घातली तसा जिवावरचा धोंडा बाजूला झाला असें वाटून त्याला हायसें वाटलें. हीच गाडी त्याला उघड्या जगांत नेऊन सोडणार होती. पहिल्या वर्गाच्या डब्यांत शिरेपर्यंत आपल्याकडचे तिकीट तिसऱ्या वर्गाचें आहे हें त्याच्या ध्यानांतच आलें नव्हते. प्रवाशा प्रवाशांतसुद्धां वर्ग आहेत म्हणायचे. तो मनात म्हणाला. आणखी एक नवानुभूति! त्यानें जेव्हां आपली चूक सुधारून घेतली तेव्हां आपले सहप्रवासी हे इटालियन मजूर असून त्याचे आवाज घोगरे आणि हात घट्ट पडलेले आहेत असे त्याला आढळून आलें. त्यानीं आपलीं आवते बाजूला ठेवलेलीं होतीं व कुठेंच लक्ष न देतां बसल्या ठिकाणींच ते गात्रांचा थकवा घालवीत होते. त्यांच्यातला कुणी एक डुलक्या घेत होता. त्याला पाहिल्यावर त्याच्या मनांत आलें, 'किती काबाडकष्ट केले असतील या लोकानीं! केलेल्या श्रमांबद्दल त्यांना पैसे मिळाले असतील. किती मिळाले असतील पण?' पैसे ही आपोआप मिळणारी वस्तु नसून मिळवायची वस्तु आहे तर मग! आजपर्यंत आपल्यासारखीच सुस्थिति सगळीकडे आहे अशी एडगरची

कल्पना! आपल्या उभय बाजूंना दैन्याच्या व दुःखाच्या केवढ्या भयंकर खाई पसरल्या आहेत याची आतांपर्यंत त्याला मुळींच जाणीव नव्हती. जगांत पुष्कळ उद्योग आहेत, धंदे आहेत आणि ते करूनच पैसे हातीं येतात--हीं व असलीं कितीतरी रहस्यें त्यानें आजवर पाहून घेतलीं नव्हतीं. या एकान्ताच्या वेळीं किती तरी नव्या गोष्टी तो शिकला होता; आणि जसजसा या प्रश्नांचा शोध घेत खिडकींतून बाहेरच्या धांवत्या वस्तुजाताकडे तो पाहूं लागला तसतसा त्याच्या मनांत जास्त जास्त प्रकाश पडूं लागला. हळूहळू, मनाच्या विषण्ण उत्कटावस्थेंत, पुढे पसरलेल्या जीवनाच्या आश्चर्यकारक अनत विविधतेची त्याला जसजशी कल्पना येत चालली तसतसें आपल्यांत कांहीं तरी वृद्धिंगत होऊन मोहरत आहे असें त्याला वाटूं लागलें. भीतीमुळें तो पळून निघाला होता आणि त्याला एकच धडकी भरली होती. पण त्याच्या या पलायनामुळेच त्याला स्वातंत्र्याचें समाधान चाखतां आलें होतें. आजवर पूर्णपणे उपेक्षिलेल्या वास्तवतेशीं त्याचा पहिल्या प्रथम संबंध जडला होता. पण हें त्याच्या दृष्टीला जसें एक महान कोडें वाटत होतें तसाच तो सुद्धां आपल्या आईवडलांच्या दृष्टीलाहि एक कोडेंच नव्हता का वाटत ? हो ! पूर्णपणें शक्य आहे हें ! त्याला आतां नवी दृष्टि प्राप्त झाली होती. जणूं काय, त्याच्या डोळ्यांपुढचे अनंत पडदे अकस्मात गळून पडले होते, वस्तुमात्राचें अंतरंग खुलें झालें होते, रहस्याचें रहस्य उलगडलें होतें. घरें वायूचे पंख लावून उडत मागें जात होतीं. या सगळया शेतामळ्यांत अन् खोपट्या झोपड्यांत कोण रहात असेल ? तो मनांत म्हणाला, ते गरीब असतील की श्रीमंत ? सुखी कीं दुःखी ? आपल्या सारख्याच अस्वस्थ उत्कंठेनें तेही भरलेले असतील का ? त्यांनाही ज्ञानाची तळमळ लागली असेल का ? ते सुद्धां आपल्या-प्रमाणेंच जीवनाशीं आजवर खेळतच राहिले असतील का ?

संयोगस्थळांवरचे बावटेवाले आतां त्याला पूर्वीसारखे योगायोगानें त्या त्या ठिकाणीं ठेवले गेलेले खेळातलें भावलें वाटेनासें झालें. एडगरला आतां कळून चुकलें कीं त्याना त्यांचीं म्हणून कांहीं कामें असतात, नियतीची परिपूर्ती करावयाची असते, जीवनसंग्रामाला तोंड द्यायचें असतें. गाडीने खालीं दरींत वळण घेतलें तसा तिचा वेग वाढला आणि पर्वतराजी मागें पडूं लागली. वसंतांतील कोमल हिरव्या रंगानें पर्वतांच्या कडांची धार मुंडावत चालली. परगंदा एडगरनें फक्त एकदांच मागें वळून आपण सोडलेल्या त्या भव्य प्रदेशाचें दर्शन घेतलें. त्या निळसर धूसर टेंकड्या अप्राप्यांत, अनंतांत अंतर्धान पावत होत्या. जसजशा त्या जास्त जास्त मागें पडून संध्याकाळच्या धुक्यांत बुडून जाऊं लागल्या तस-तसें आपलें बाल्य त्या कालगत आणि भयदगंभीर प्रदेशांत कायमचें जमा झालें असें त्याला वाटूं लागलें.

---

## निबिड अंधारांत : : : : १३

शेवटीं उतारूंची पांगापांग होऊन एडगर जेव्हां बेडनच्या स्टेशनवर एकटाच उरला तेव्हां आजूबाजूचे सिग्नलचे हिरवे तांबडे कंदील पाहून रात्र पडल्याची त्याला जाणीव झाली आणि त्याचा उत्साह आणि आनंद अदृश्य झाला. अपरिमित औदासिन्याने त्याचे अंतःकरण व्यापून गेलें. दिवस पडला नव्हता तोपर्यंत त्याच्याभोंवतीं माणसांची गजबज होती; लहान मुलांचे चित्त वेधून घेणाऱ्या विविध प्रकारच्या गोष्टी होत्या; बांकावर बसून येणाऱ्या जाणाऱ्याकडे बघतां येत होतें; रस्त्यांतून भटकत भटकत दुकानांत डोकावून पहातां येत होतें. पण जो तो आपापल्या घरीं दारें

लावून बसला म्हणजे कसें व्हायचें ! लोक आपापल्या जागीं खुशाल झोपीं गेलेले असतील आणि आपणाला मात्र कृतकर्माच्या पश्चात्तापानें पोळत निर्जन रस्त्यांतून परागंदा स्थितींत एकाकी भटकावें लागणार ! आतां क्षणसुद्धां वायां जाऊं न देतां कुठंतरी तत्काळ आश्रय घेतलाच पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी त्याची खात्री झाली.

डावी उजवीकडे न पहातां तीरासारखा तडक तो आजीच्या बंगल्याकडे जाऊं लागला. हा बंगला रस्त्याच्या कडेला एका बागेंत होता आणि त्याचा बराचसा भाग वेगवेगळ्या तऱ्हेच्या वेलींनीं आच्छादला गेला होता. वृक्षवेलींच्या हिरव्यागार पार्श्वभूमीवर ती जुन्या थाटाची शुभ्र, स्नेहल इमारत फार उठून दिसत होती. गरादीवरून एडगरनें आत डोकावून पाहिलें. पण आज त्याला परकेपणा वाटत होता. खिडकींतून उजेड दिसला नाहीं कीं कसली हालचाल दिसली नाहीं. त्याला वाटलें कीं आजी कुणा पाहुण्यांबरोबर पलीकडच्या कुरणावर कॉफी पीत बसली असेल.

घंटा दाबण्यासाठीं त्याचा हात वर गेलाच होता, पण तोंच एक दारुण विचार त्याच्या मनात आला. आतांपर्यंत आजीचा आश्रय घेण्याचा बेत त्याला सुलभ वाटला होता. पण अकस्मात त्याला एक शंका आली. आपल्या अनपेक्षित आगमनाचें समर्थन कसें करायचें ! तिच्याकडून येणाऱ्या ठरलेल्या प्रश्नांना काय उत्तरें द्यायचीं ! आपण आईकडून पळून आल्याची वार्ता कळल्यानंतरचा तिचा साश्चर्य चेहरा त्याला दिसूं लागला. शिवाय आईवर हात उचलल्याचें आपणाला कबूल करावे लागेल, असाही विचार त्याला आला आणि त्यासरशीं आपल्या प्रमादाचा भयंकरपणा त्याला जास्तच त्रास देऊं लागला. इतक्यात

कुठलें तरी दार वाजलें. त्यानें डोळे फाडून, त्या बाजूला पाहिलें आणि त्याला एकच धडकी भरली. कुणी तरी बाहेर आलें आणि इकडे घुटमळतांना आपणाला पकडलें तर ! त्यानें धूम ठोकली. आपण कुठें पळतों आहों याचें त्याला भानही नव्हतें.

शहराच्या बागेच्या फाटकाशीं पोंचताच तो थांबला. तिकडे काळोख होता आणि कुणीही दिसत नव्हतें. त्याला वाटलें, तिकडे एकाद्या निवांत जागीं बसून आपणाला शांतपणाने साऱ्या परिस्थितीचा नीट विचार करतां येईल. तो तेथल्याच एका निर्जन वाटेनें जाऊं लागला. दिव्यांच्या मंद प्रकाशांत झाडें पिशाच्चवत् दिसत होतीं. पण तो जी टेंकडी चढून जात होता तिच्या माथ्यावर वस्तुजात काळवंडून गेलें होतें आणि वसंत-कालीन रात्रीची बाष्परुद्ध विषण्णता त्याच्यावर पसरून राहिली होती. एक दोन जोडपीं आपल्याच नादात गर्क होऊन बसलीं होतीं. तो तिकडून चटकन पुढें झाला कारण त्याला निवातपणा पाहिजे होता. पण कुठेंच निवांतपणा सापडत नव्हता. झाडाझुडपाच्या छायागडद आसमंतांतून कुजबूज कानावर येत होती आणि वाऱ्याच्या झुळकेबरोबर ती पालवीच्या अन् गवताच्या सळसळींत मिसळून जात होती. वाटेतल्या चोरट्या पाव-लांचे आवाज, खालच्या आवाजांत अद्‌भुत उन्मादक हास्यध्वनि इकडून तिकडून निनादत होते. हे आवाज माणसाचे कीं जनावराचे? निसर्ग निद्रेची दुलई लपेटून राहिला होता पण सारं वस्तुजात चळवळत होतें. जीवनाचें हें उकळते आधण त्याच्या मनाला पराकाष्ठेचें अस्वास्थ्य आणीत होतें. वस्तुजाताची ही संभ्रमावस्था ऋतुकालाचीच द्योतक असेल का ?

तो अंग चोरून एका बांकावर बसला. स्वतःची क्षुद्रता आणि असहा-य्यता इतक्या तीव्रतनें यापूर्वी त्याला कधींच जाणवली नव्हती. आपल्या पलायनाचें स्पष्टीकरण कसें करावें याचा त्यानें बराच वेळ विचार करून

पाहिला; पण आपले विचार एकाग्र करणें त्याला अशक्य झालें.
त्यांची शिकस्त करूनहि काळोखांतून येणाऱ्या त्या अद्भुत ध्वनींकडे
करणें त्याला साधेना. त्याच्या श्रुति पुन्हां पुन्हां तिकडे ओढ घेत
तो काळोख किती भयंकर आणि भ्रांतिकारक होता ! तरीहि त्याचें
रम्योद्भुत होतें ! हे कंप आणि हीं कूजितें, हें भ्रमण आणि हें विले
कुठून येतंय हें सारें ? मनुष्यमात्रांतून कीं जीवमात्रातून ? कीं हा
वृक्षशाखांतील वायूचा खेळ आहे ? एडगरने कान दिला. हो.
पानांतून सळसळत आहे...छेः दृढालिंगनांत रममाण झालेल्या त्या ?
जोडप्याचीच कुजबूज आहे ती ! स्त्री आणि पुरुष. शहरांतला
उजेड सोडून एकान्त मिळण्यासाठीं तीं या काळोखांत आलीं. कं
हेतूने ? त्या प्रश्नाचें उत्तर त्याला मिळालें असतें तर त्याला शांति ल
असती आणि त्याच्या गांजलेल्या चित्ताला विसांवा मिळाला असता.
माणसें आणि तीं एक आकृति दिसावी अशा रीतीनें एकमेकाना ।
लेलीं—त्याची आई आणि बॅरन होतीं तशीं ! ... मग ते दारुण
इथें सुद्धा आहे तर ? त्याचीं पावलें जवळ येऊं लागलीं; मधुर हास्याचा ?
ध्वनि ऐकूं येऊं लागला. त्या जवळ येणाऱ्या जोडप्याला आपण दिसलो
तो चार पावलें मागें हटून काळोखांत दडून राहिला. त्याच्या कांहीं तें
आले नाहीं. परस्परालिंगनात दंग झालेलीं अशीं तीं संथपणें त्याच्या ज
पुढें गेलीं. एडगर मोकळेपणानें श्वास सोडूं पहात होता. तोंच मु
मुख दाबीत तीं तेथेंच थांबलीं. आणि त्या स्त्रीच्या तोंडून समाधानाचा सु
बाहेर पडला. त्या पुरुषाच्या मुखांतून कांहीं द्रुत उद्गार बाहेर पडले. एड
विलक्षण भीति वाटली पण त्या बरोबरच अपरिचित सुखानें त्याचें
शहारून गेलें. मिनिटभरानें त्यांच्या पायाखालचीं ढेकळें पिचल
आवाज झाला व तें जोडपें काळोखांत दिसेनासें झालें.

# निबिड अंधारांत

एडगरच्या नाड्या जोरानें उडत होत्या आणि एकाकीपणाच्या जाणिवेनें त्याची पकड घेतली होती. केव्हां एकदां प्रियजनांचा स्वर कानीं पडेल, प्रेमळ बाहुपाश आपणाला जवळ घेतील, उजेडानें भरलेली परिचयाची खोली आणि मायेचीं माणसें दिसूं लागतील असें त्याला होऊन गेलें. रात्रीचा तो भीषण काळोख त्याच्या हाडींमाशीं खिळल्यासारखा झाला होता. आपण इथून निसटलों नाहीं तर आपलें काळीज फुटून निघेल असें त्याला वाटूं लागलें.

घर ! घर ! सुप्रकाशित उबदार खोली ! ओळखीचीं माणसें ! मग सगळं ठीक होऊन जाईल. एकदां आपण आपल्या माणसांत गेलों म्हणजे कांहीं वाईट व्हायचं नाहीं. फार तर तीं रागें भरतील किंवा मारतील इतकेंच. या निर्जन काळोखापेक्षा तें पुरवलें.

आपण काय करतों आहोंत याची शुद्ध न राहून तो सारखा पळत राहिला तो आजीच्या घराशीं येऊन थांबला. घंटा वाजवण्यासाठीं हातसुद्धा घातला त्यानें. वेलीच्या पालवीमागून खिडक्यांतला प्रकाश दिसत होता; आंतल्या चिरपरिचित खोल्या व त्यातलीं मायेचीं माणसें कल्पनेनें त्याला दिसत होतीं. हें सान्निध्य सुखकारक होतें. घंटा वाजविण्याच्या बाबतींत त्यानें आतां जो विलंब लावला तो या सुखाच्या, प्रियजनसहवासाच्या जाणीवेचा पूर्वास्वाद घेण्यासाठीं.

तोंच मागून कर्णकर्कश आवाज ऐकूं आल्यामुळें तो भानावर आला.

'वाः एडगर ! एकदांचा आलास बाबा शेवटीं !'

ती त्याच्या आजीची मोलकरीण होती. ती धांवतच त्याच्याजवळ गेली आणि तिनें त्याला कडकडून पोटाशीं धरलें.

जादूच्या चमत्काराप्रमाणें दारें धडाधड उघडीं झालीं, कुत्रे धांवत येऊन भुंकत भोंवतीं उड्या मारूं लागले, कंदील मेणबत्त्या घेऊन माणसें गोळा झालीं, आश्चर्य आणि आनंद याचे संमिश्र उद्गार कानांत दुमदुमूं लागले आणि प्रियजनांच्या स्वरूपांचा एकच कल्लोळ त्याच्या कानाडोळ्यांपुढें उडून गेला. त्याच्या आजीनें त्याला घट्ट पोटाशीं धरलें होतें, आणि तिच्यामागून—तो स्वप्नांत तर नव्हता ?—त्याची आई होती. लाजेनें तो चूरमार झाला होता, त्याचें सर्वांग थरथरत होतें आणि डोळ्यांतून आंसवें ओघळण्याच्या बेतात आलीं होतीं. कुठं जावें किंवा काय करावें हे कळेनासें होऊन तो निश्चल होऊन राहिला होता. ती भीती होती कीं सुखाची परिसीमा होती !

---

## शेवटचें स्वप्न : : : : : : १३

हो, ती त्याची आईच होती. सिमरिंग स्टेशनावर विचारपूस करून त्याच्या पलायनाचा माग तिनें काढला होता. व्हियेन्नाला नवऱ्याला आणि बेडनला आईकडे तिनें केव्हाच तारा पाठविल्या होत्या. तो कसा पोचला नाहीं ? फ्रो ब्लुमेंतालनें एक्स्प्रेस पकडली आणि त्याच्या आधीं ती बेडनला हजर झाली. त्यांनीं त्याला विजयानंदानें दिवाणखान्यांत नेलें. त्याला त्या थोड्या बोलल्या खऱ्या पण त्या बोलण्याचें त्याला दुःख झालें नाहीं. कारण त्याला त्यांच्या डोळ्यात प्रेम आणि आनंद याखेरीज कांहींएक दिसत नव्हतें; त्यांचा तो लटका रागसुद्धा फार वेळ टिकला नाहीं. क्षमा मागण्या-आधींच तो निवला होता. आतां आजीनें त्याला पुन्हां पोटाशीं धरलें होतें

आणि ती त्याच्यावर अश्रू ढाळीत होती. कुणीच त्याला तसें रागें भरलें नाहीं. त्याला त्याचें आश्चर्य वाटलें. त्याला वाटत होतें कीं आपण प्रेमाचे बंदीवान आहों. मोलकरणीनें त्याच्या अंगचा पातळ कोट काढला आणि त्याला गरम शालींत गुंडाळलें. अन्, तुला भूक लागली आहे का किंवा आणखी कांहीं हवंय का ? अशी चौकशी केली. मूल म्हणून आपल्याला वागवलें म्हणजे पूर्वी त्याला राग येत असे पण आतां त्यातच त्याला परमानंद होऊं लागला. गेल्या दिवसातला सारा उद्धटपणा आणि अभिमानवृत्ति त्याला सोडून गेली होती.

शेजारच्या खोलींतून टेलिफोन वाजल्याचें ऐकूं आलें. त्याची आई उत्तर करूं लागली ' हो...एडगर आला...ठीक आहे...' ती आपल्यावर कशी रागावली नाहीं याचा त्याला अचंबा वाटला. अपूर्व भावानें तिचे प्रेमळ डोळे त्याला कुरवाळीत होते. बर्था मावशी आणि आजी यांचे कोडकौतुक झुगारून देऊन आईच्या बाहुपाशात जाऊन उडी घ्यावी आणि तिची क्षमा मागून तिला हवं ते कबूल करावें अशी उर्मि त्याच्या मनात उसळून आली. तो उठूं लागला. पण दचकून जाऊन आजीने त्याला विचारलें,

' कुठं जातोस, बाळ ? '

जरा कुठं त्यानं हालचाल केली तर त्यांचीं मनं इतकीं खालींवर होत होतीं तर ! त्याना वाटलं, तो पुन्हा पळून जातो कीं काय ! त्यानं चांगलंच त्यांना भय घातलं होतं म्हणायचं ! आपल्या पलायनाचा आपल्या इतका खेद कुणालाच झालेला नाहीं हें त्यांना कसं पटवायचं ? हा प्रश्न सारखा त्याला छळीत होता.

जेवणाची वेळ होण्याआधींच त्याचें जेवण त्याच्यापुढें हजर झालें होतें. आजी त्याच्याजवळ बसली होती आणि तिचे डोळे सारखे त्याच्यावर

लागले होते. आजी, मावशी आणि मोलकरीण यांनीं तर त्याच्याभोंवतीं ममतेचें कडेंच तयार केलें होतें. त्यांच्या जिव्हाळ्याच्या उबेनें त्याचे सारे शीण सार्थकीं लागले होते. पण आई कां नाहीं आली ! तिच्या गैरहजेरी-मुळें त्याचें चित्त अस्वस्थ झालें. पश्चात्तापानें तो कसा जळून निघाला हें तिला कळतें तर......

बाहेर गाडी थांबल्याचा आवाज झाला. आजी निघून गेली. अनेक आवाजांच्या गलबलाटांतही एडगरला आपल्या वडलांचा आवाज ओळखतां आला. मावशी आणि मोलकरीण सुद्धां बाहेर दिवाणखान्यांत गेलीं होतीं. एडगर आतां पुन्हां एकदा एकटा पडला आणि पुन्हा एकदां एकान्तामुळें घाबरून गेला. बापानें त्याला नेहमींच कडकपणानें वागविलें होतें. त्यामुळें त्याला तो फार घाबरत असे. दारापलीकडून वडलांचा आवाज त्याच्या कानीं येत होता. ते संतापलेले दिसत होते आणि बोलतां बोलतां संतापानें त्यांचा आवाज चढत होता. त्याची आई त्यांना शांत करण्याची पराकाष्टा करीत होती. पण त्यांचीं बेगुमान पावलें त्याच्याच दिशेनें येत होतीं. एकदम दार उघडलें गेलें आणि वडलांची भव्य मूर्ति त्याच्या दृष्टीस पडली. त्यांचा करडा स्वर कानीं पडताच एडगरचा जीव मुंगी-एवढाला होऊन गेला. त्यांनीं विचारलें,

‘ गाढवा, कोणता समंध तुझ्या मानगुटीला बसला म्हणून तूं असा पळून जाऊन तुझ्या आईला असं धास्तींत पाडलंस ! ’

गृहस्थ खरोखरच फार संतापला होता; पण त्याची आई बरोबर नवऱ्याच्या पाठीमागें उभी राहिली होती. तिच्या तोंडावर सावली पडल्या-मुळें तिच्याकडून सूचना घेणें त्याला शक्य नव्हतें म्हणून त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

" काय ? दांतखीळ बसली का तुझी.? कुणी घोडं मारलं होतं तुझं ? बोल, घाबरूं नकोस. तुला लागण्यासारखं वागलं का कुणी ? "

उत्तर देण्यासाठीं एडगर धडपड करूं लागला. आठवणीसरशीं त्याच्या मनांत दुःख आणि संताप जागीं होऊं लागलीं. आपण समर्थन करावं का ? त्यानें डोळे वर करून आईकडे पाहिलें. ती अजून आपल्या नवऱ्याच्या भव्य छायेंतच उभी होती पण ती कांहींतरी खुणावते आहे असें एडगरला वाटलें. तिनें हळूच आपलें बोट तोंडावर ठेवलें आणि तिचे डोळे गप्प रहाण्याबद्दल त्याला आर्जवूं लागले.

एडगरचें अंतःकरण फुलून आलें. आपल्या रहस्याचा परिस्फोट न करण्याबद्दल ती आपल्याला विनवीत आहे एवढें त्याला समजलें. हर्षानें आणि अभिमानानें त्याला अस्मान ठेंगणें झालें. जिवाचा धडा करून तो बोलला,

" तसं कांहींच कारण नव्हतं पपा. मोठ्या मजेंत होतों मी. आई तर मला कांहींच उणें पडूं देत नसे. पण मलाच एकाएकीं वाटलें कीं आपण खूपसा द्वाडपणा करावा आणि म्हणून मी पळालों. "

साशंक होऊन त्यांनीं मुलाकडे पाहिलें. असलें उत्तर मिळेल याची त्यांना मुळींच कल्पना नव्हती. या स्पष्ट कबुलीजबाबापुढें त्यांचीं सारीं शस्त्रें लळीं पडलीं.

'ठीक.' ते म्हणाले ' झाल्या प्रकाराबद्दल तूं पस्तावला असलास तर बोलणंच खुंटलं. यापुढं असें कांहीं तरी करण्यापूर्वी थोडा अधिक विचार करीत जा म्हणजे झालें.' त्यांनीं प्रेमळ दृष्टीनें मुलाला आपादमस्तक पाहून घेतलें आणि त्यासरशीं त्यांच्या आवाजाला मार्दव आलें. ते म्हणाले,

' थोडा निस्तेज दिसतोय तुझा चेहरा पण घरून गेल्यापासून चांगलाच वाढलेला दिसतोस तूं. यापुढं असल्या खोड्या करायच्या नाहींत बरं ! आतां तूं कांहीं लहान नाहींस, तेव्हां संमजसपणानें वागलं पाहिजेस यापुढं...'

एडगरनें टक लावून आईकडे पाहिले. पूर्वी कधींही न दिसलेली चमक तिच्या डोळ्यात होती आणि ओलावून येऊन ते लकाकत होते आणि कृतज्ञतेनें भरलेलें स्वर्गीय स्मित तिच्या जिवणीभोंवतीं खेळत होते.

त्याला आतां झोंपीं जायला सागण्यांत आले पण त्याची त्याला चीड आली नाहीं कीं एकटें रहावे लागल्याचें दुःख झालें नाहीं. त्याचें चित्त विचारानीं नादावत होतें. खऱ्या अनुभवाच्या नाविन्यांत आणि आनंदांत गेल्या दिवसातलीं त्याचीं सारीं दुःखे तो विसरून जाऊन सत्य-सृष्टीशीं कराव्या लागणाऱ्या भावी संग्रामाची निर्भयतेने वाट पाहूं लागला होता. बाहेर वाऱ्यामुळें झाडे हलत होतीं, सळसळत होतीं. पण त्या गड-बडीमुळें त्याचें चित्त उदास होत नव्हतें. जीवन ऐश्वर्यसंपन्न आहे, सहस्त्र-विध आहे हें त्याला पटलें होतें; दंभ आणि असत्य यांची प्रावरणे झुगारून देऊन आपल्या स्वयंसिद्ध भीषण सौंदर्याचें दर्शन त्याने त्याला दिलें होतें. विशिष्ट व्यक्तींबद्दल किंवा गोष्टींबद्दल दावा बाळगणें ही गोष्ट त्याला पोरकट-पणाची आणि अज्ञानाची वाटूं लागली. एके काळचा त्याचा वैरी बॅर-नही आज त्याच्या उत्कट कृतज्ञतेचा वांटेकरी होऊन राहिला होता कारण या खोट्या मित्रामुळेंच त्याला भावनांच्या यक्षनगरींत असा प्रवेश मिळाला होता.

तृप्ति, अभिमान, हर्ष इत्यादि भावनांचा आस्वाद घेत एडगर काळोखांत पडून राहिला होता, आणि तशा स्थितींत त्याच्यावर झोंपेचा अंमल चढत चालला होता. तोंच त्याला वाटलें, कुणी तरी खोलींत आलें

असून मधुरपणानें आपल्या केसांतून बोटें खेळवीत आहे. अश्रूंचे थेंब त्याच्या गालावर पडले...आणि, एक शब्दहि न बोलतां जिवाभावानें आईनें त्याचा मुका घेतला. या अश्रूंचा आणि मुक्यांचा पुरा अर्थ फार वर्षांनीं एडगरला कळून आला. यापुढें आपलें सारें प्रेम, आपल्या साऱ्या शक्ति मुलापायीं वेंचायच्या; शृंगारसाहसावर पाणी सोडायचें; शरीरसुखाला मूठमाती द्यायची, असा तो संकल्प होता, प्रतिज्ञा होती. निरर्थक आणि अपात्र अशा भानगडींतून आपली सुटका केल्याबद्दल ती मुलाची जन्माची ऋणी होऊन राहिली होती; आणि कृतज्ञतेच्या या कटुमधुर भाराखालींच तिनें मुलासाठीं जगण्याचें व्रत स्वीकारले होतें. बालपणा-मुळें त्यावेळीं जरी एडगरला तिच्या या वर्तनाचें पुरे महत्त्व कळलें नाहीं तरी इतकें उत्कट प्रेम मिळणें मोठ्या भाग्याचें आहे एवढें त्याला समजलें आणि तेवढ्यावरून त्यानें निष्कर्ष काढला कीं कोणत्यातरी अगम्य प्रकारानें याच प्रेमाचे धागे जीवनाच्या महत्तम रहस्यांत कायमचे गुंतले गेले आहेत.

ती दार लावून निघून गेल्यावरसुद्धां एडगरला तिचें सान्निध्य जाणवत होतें आणि तिच्या ओठाचा उबदार स्पर्श त्याच्या गालां-वर तरळत होता. जसजसा त्याच्यावरचा झोंपेचा अंमल वाढत गेला तसतसें अर्धनिद्रावस्थेंतच त्याला वाटूं लागलें कीं मृदुल ओठांचा तो दाब असाच निरंतर आपणाला मिळत रहावा. गेल्या प्रसंगपूर्ण दिवसांचा सारा चित्रपट त्याच्या मिटल्या दृष्टीपुढून वेगानें जात होता आणि त्यांतलीं चित्रें पुसट होत होतीं; त्याचें बाल्य आतां संपलें होतें; नियतीनें त्याच्या यौवनग्रंथाचीं पानें उलटायला सुरवात केली होती; त्याला झोंप लागली आणि त्याचें परम गहन जीवनस्वप्न एकेका पाकळीनें उमलूं लागलें.

समाप्त

# आमचें प्रकाशन

## कादंबऱ्या

तांबडी माती — बा. सी. मर्ढेकर
अंधारांतली वाट — बा. भ. बोरकर
काश्मिरी गुलाब — प्रो. फडके
कुलाब्याची दांडी — ,,
दौलत ( सं. आ. ) — ,,
रिकामा देव्हारा — खांडेकर
सुखाचा शोध — ,,
दिव्यचक्षु — कु. रत्नप्रभा रणदिवे
आंधळा न्याय — वि. वा. पत्की
समरांगण — म. भा. भोसले

## लघुकथा

दत्तक व इतर गोष्टी — खांडेकर
विद्युत्प्रकाश — ,,
पाकळ्या (३री आवृत्ति) — ,,
परिस आणि लोखंड — शं. गो. गोखले
विश्रांति — प्रो. भा. म. गोरे
मकरंद — कमल दीक्षित
कोंवळीं किरणें — दि. द. पाटील

## काव्य

भिकारीण व इ. कविता — मंगसुळीकर
जीवनप्रभा — द. दा. पेंडसे
संसार — सौ. संजीवनी मराठे

## संस्कृत

द्विविभूतिचरितम् — रा. वि. गोखले
बलिदानम् — लाटकरशास्त्री

## नाटकें व नाटिका

तोतया नाटककार — प्रो. फडके
जडावाची देवी — ,,
आगलावी — ,,
विदुषी — ना. धों. ताम्हनकर
मंगळागौर — ,,

## संकीर्ण

हिरवे कंदील — अनंत काणेकर
तुषार — प्रो. पंगु
आस्वाद — ,,
वाङ्मयविलास — माडखोलकर
वनभोजन — खांडेकर
धुंधुर्मास — ,,
प्रतिभासाधन (३री आ.) — प्रो. फडके
साहित्य आणि संसार ( २ री आ. ) — ,,
वाङ्मयविहार (२री आ.) — ,,
मानसमंदीर — ,,
खांडेकर चरित्र आणि वाङ्मय — प्रो. मा. का. देशपांडे
कलेच्चीं क्षितिजें — प्रभाकर पाध्ये
बुद्धिबलक्रीडारत्नें — हळदीकर
लघुरत्नपरीक्षा — म. ल. खांबेटे
अभिनयकला — मिरजकर
व्यायामाचा अभ्यास भाग १ — गुते व गुरव

प्रकाशक : दा. ना. मोघे, कोल्हापूर.